वरच्या चांदण्यांशीं खेळायला

देवाघरीं गेलेला

माझा मुलगा

**शरच्चन्द्र**

याच्या

स्मृतीस



---

चार चांदण्या

---

# चार शब्द

नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेल्या माझ्या चार एकांकी नाटिका किंचित् फेरफार करून या पुस्तकांत संग्रहित केल्या आहेत. उत्सव-संमेलनप्रसंगीं प्रस्तुत नाटिकांचे प्रयोग नेहमीं सर्वत्र होत असतात. प्रयोग करणाऱ्या मंडळींच्या सूचनेवरूनच माझ्या ध्वनिमुद्रित भावगीतांपैकीं कांहीं भावगीतें प्रत्येक नाटिकेंत समाविष्ट केलीं असून मूळच्या गद्य नाटिकांवर संगीताचा साज चढविला आहे. यांतील बहुतेक सर्वच गाणीं लोकांच्या तोंडीं असल्यानें त्यांच्या चाली परिचित आहेतच. 'डोळ्यांत धूळ' या नाटिकेची कल्पना एका इंग्रजी प्रहसनावरून सुचलेली आहे. 'शिकलेले शहाणे' ही नाटिका 'यशवंत' मासिकांत 'सुशिक्षितांची बेकारी' या शीर्षकाखालीं प्रसिद्ध झाली होती.

प्रस्तुत नाटिकांना प्रथम प्रसिद्धि देणारे नियतकालिकांचे संपादक, त्याचप्रमाणें त्या पुस्तकरूपानें छापतांना महत्त्वाच्या सूचना करणारे माझे लेखक-मित्र श्री. र. गो. सरदेसाई व श्री. गो. वा. पाध्ये आणि पुस्तकाचें बाह्यांग सजविणारे आर्टिस्ट श्री. पु. श्री. काळे या सर्वांचा मी अत्यंत ऋणी आहें. 'रात्रीचा पाहुणा' याखेरीज इतर सर्व नाटिका ऑल इंडिया रेडिओ–मुंबई स्टेशनवरून ध्वनिक्षेपित केल्या गेल्या असून त्याबद्दल रेडिओ-चालकांचाहि मी आभारी आहें.

नाट्यप्रेमी रसिकांनीं आजवर माझ्या नाटकांचें अपरंपार कोडकौतुक केलें आहे. त्याबद्दल मी सदैव कृतज्ञ आहेंच. या नाटिकांचेंहि ते सहर्ष स्वागत करतील अशी मला आशा आहे.

शेवटीं, या 'चार चांदण्या' मोठ्या हौसेनें प्रकाशांत आणल्याबद्दल 'कर्नाटक पब्लिशिंग हाऊस'चे मालक, माझे मित्र श्री. मंगेशराव कुळकर्णी यांचे मनःपूर्वक आभार मानून हे चार शब्द पुरे करतों.

ताराबाग, मुंबई, नं. ४
ता. २० ऑगस्ट १९४१

सदाशिव अनन्त शुक्ल

# ✷ चार चांदण्या ✷



## डोळ्यांत धूळ

[ ' यशवंत '—जुलै १९३८ ]



## समाजसेविका

[ ' मौज '—दिवाळी अंक १९३७ ]



## शिकलेले शहाणे

[ ' यशवंत '—अंक ८२ ]



## रात्रीचा पाहुणा

[ ' झारापकर '—जून १९४० ]



कर्नाटक पब्लिशिंग हाऊस, मुंबई नं. २

## पात्रें :

[ प्रवेशाच्या अनुक्रमानें ]

वन्सी

शांता

रमाकाकू

आवडाबाई

वासंती

कमल

चारुबाला

**स्थळ :** मुंबई शहर. मध्यवस्तींतली एक चाळ.

**काळ :** जुलै महिन्यांतील एक रविवार. दुपारीं चार–साडेचारचा सुमार.

---

# डोळ्यांत धूळ

गचाळ चाळींतला पहिल्या मजल्यावरचा एक 'ब्लॉक.' आंत प्रवेशून समोर 'पोटखोली'त जरा डोकावतांच सर्वत्र अस्ताव्यस्त स्वरूपाचा ' प्रपंचवस्तुसंग्रह ' आपलें ' विराट् विश्वरूपदर्शन ' घडवितो. दांडीवर लोंबकळणारे कपडे, खुंटाळ्यांना अडकविलेलीं बोचकीं, तारेचीं शिंकीं वगैरे घरसामानाच्या अड-गळींनच खालीं एक कॉट पसरलेली आहे. तिच्यावरती गुंडाळलेल्या बिछान्यांचा व मळक्या चिरगुटांचा ढीग रचलेला असून खालींहि असंख्य चीजांचा ' जुना-बाजार ' थाटला आहे. या पोटखोलीच्या पलीकडे पाकस्थान ऊर्फ स्वयंपाकघर असून तेथून भांड्यांचे, स्टोव्हचे वगैरे बरेच संमिश्र आवाज येताहेत.

दर्शनी खोलींत जरा विशेष टापटीप केलेली दिसते. एका मळकट सतरंजीला जोडूनच दोन चटया दोहों बाजूला अंथरलेल्या असून त्यावर मधोमध एक मोठी चौपाई ठेवून तिच्याभोवतीं चार खुर्च्या मांडलेल्या आहेत. पलीकडे

कोपऱ्यांत स्वच्छ धोतरानें झांकून टाकलेल्या ट्रंक-पेटाऱ्यांच्या डोलाऱ्याशेजारींच एक जुनें, मोडकें कपाट भिंतीच्या आधारानें कसेंबसें उभें आहे. दुसऱ्या कोपऱ्यांत खिडकीशींच असलेल्या टेबलावर आरसा, पुस्तकें, वृत्तपत्रें वगैरे वस्तूंनीं गर्दी केलेली आहे. भिंतीवरच्या सचित्र कॅलेंडरांनीं, देवादिकांच्या तसबिरींनींहि त्या खोलीची ' शोभा ' थोडीफार वाढविलेली दिसते. सारांश, एखाद्या मध्यम-स्थितींतील सद्गृहस्थाच्या बिऱ्हाडाप्रमाणेंच त्या बिऱ्हाडाचें एकंदर स्वरूप व वातावरण आहे.

दर्शनीं खोलींत बन्सी, उमर वर्षें अंदाजें सात, आरामखुर्चीवर पाय पोटाशीं घेऊन एका पुस्तकांतलीं चित्रें पहाण्यांत गढून गेला आहे. नऊ दहा वर्षांची त्याची थोरली बहीण शांता पुढील गाणें गुणगुणत टेबलखुर्च्या फडक्यानें पुसत आहे.

जगीं खेळत प्रभुराया ! अवघी तुझी माया
नवलाची नटे किमया; मनुजा मोहवि वाया
नभिं चंद्र सूर्य तारे
नवलाख हिरे गहिरे
तेजांत बुडे दुनिया !
प्रतिबिंबच सुंदरसें
अणुरेणुंत नित विलसे
तें रूप तुझें सदया !

[ रमाकाकू पदरानें घाम पुशीत स्वयंपाकघरांतून येतात.

**रमाकाकू :** हुश्श ! दमलें बाई !

**शांता :** आई, झालं ना ग सगळं ?

**रमाकाकू :** आमच्याकडून माऽऽरी तयारी आहे. आतां हवं तेव्हां ये म्हणावं सटवे! ( सहज बाहेर पहात ) पण मेलं अंधारून किति आलंय्! गच्च भरलंय् आभाळ. पाऊस कोसळणारसं वाटतंय्.

[ शांता चौपाईवर जाळीचा रुमाल पसरूं लागते. तो वाऱ्यानं उडतो.

**शांता :** या वाऱ्यानं तर भंडावून सोडलं बाई! ( धाडकन् दार लावते. )

**रमाकाकू :** अग, ती फुलदाणी ठेव ना त्यावर. म्हणजे–

**शांता :** पण फुलं कुठं आहेत फुलदाणींत? रिकामीच कशाला ठेवायची, उगीच तिनं हंसायला?

**रमाकाकू :** कमळीला सांगितलंय् फुलं आणायला. पण ती उगवेल तेव्हां खरी. ही वासंतीहि कुठं हिंडतेय् देव जाणे! मीच एकटीनं किती मरायचं बाई! चहुंकडची आवरासावर करतां करतां कंबर मोडली माझी. ( खुर्चीवर बसते. )

**शांता :** पण खोली कशी छान, झकपक दिसतेय् नाहीं आतां? कुणाला वाटायचं, आज हळदीकुंकूंच आहे आमच्या घरीं.

**रमाकाकू :** पण शांता, ती हातपेटी जरा पूस तरी फडक्यानं: अन् जरा इकडेच सारून ठेव ना?

**शांता :** कशाला? मोडकी तर आहे ती.

**रमाकाकू :** हो ग! पण आमच्या घरीं बाजाची पेटी आहे एवढं तरी तिला कळूं दे की. खरंच, त्या गनड्यांचा फोनो आणतेस मागून?

**शांता :** मागितला मघाशीच. देत नाहींत ते.

**रमाकाकू :** नाहीं तर नाहीं. घ्या म्हणावं उरावर ठेवून.

**शांता :** पण आई, फराळाचं पुरवठ्याला येईल ना ग सगळं? चिवडा, बिस्किटं, केळीं...

**रमाकाकू :** हो–बरी आठवण केलीस. कुंकवाच्या पेटींतले दोन आणे घे अन् डझनभर सफेत वेलची घेऊन ये कोपऱ्यावरनं. अगदीं धांवत जाऊन पळत ये....

**शांता :** सफेत वेलची? ( पैसे आणायला आंत जाते. )

**बन्सी :** ( पुस्तक भिरकावून ) अन् दोन आण्यांचें ? चित्रळ्याप्रमाणं ती काय नुसत्या वेलचीचेच फक्के मारणार कीं काय ? पण आई, सफेत वेलची तीं कसली ग ? वेलची कुठं काळी असते ?

[ शांता केळीं आणायला जाते.

**रमाकाकू :** वेड्या ! सफेत वेलची म्हणजे केळीं ! सफेत वेलदोडे नव्हेत. . .कार्टी सताड दार उघडं टाकून गेली. बन्सी, ऊठ आधी. ते दार लावून घे. गॅलरीतला सगळा कचरा आंत येतोय् वाऱ्यानं...

[ बन्सी उठून दार लावतो. व नंतर फळफळावळांच्या ताटाकडे जातो.

**बन्सी :** इतकीं तर केळीं आहेत. आणखी कशाला हवींत ? ती काय नुसती केळींच खाणार वाटतं ? ( बोलतां बोलतां एक केळें खातो )

**रमाकाकू :** बाई ! बाई ! शर्थ झाली तुझ्यापुढं. सतरंजीवर साल टाकलीस ? हजार वेळां बजावलं तुला सकाळपासून, घाण करूं नको म्हणून. चल उचल तीं सालपटं. टाक बाहेर...

**बन्सी :** पण कुणी पडेल ना त्यावरनं पाय घसरून तोंडघशी !

**रमाकाकू :** तूं जा मग त्याला उचलायला. चावट कुठला ! उचल तीं सालं....( बन्सी खिडकींतून सालं फेकतो. ) अन् तसंच तें पुस्तक उचल. नीट जाग्यावर ठेव. कांडीची शिस्त नाहीं कार्ट्याला. अन् नळावर जाऊन स्वच्छ तोंड धुऊन ये...

**बन्सी :** सकाळीं धुतलंय् तोंड. पुन्हां दुपारीं जेवल्यावरसुद्धां धुतलं...

**रमाकाकू :** फाजीलपणा पुरे कर. काय कपडे ! काय अवतार ! आधीं नाक साफ कर चांगलं. नवा शर्ट, धुतलेली चड्डी घाल. घाणेरडेपणा रोजचा आहेच. आजचा दिवस तरी अंमळ स्वच्छता दिसूंदे कीं. आंघोळसुद्धां केली नाहींस ना आज ? अन् नथू कुठं गेलाय् ? रस्त्यावर हुदळ्या घालीत असेल ! आज कुणी कुठं बाहेर जायचं नाहीं म्हणून सारखी ओरडतेय्...

**बन्सी :** पण आज एवढं आहे तरी काय ?

**रमाकाकू :** अरे, वासंतीताईची शाळेंतली मैत्रीण आपल्याकडे चहा-फराळाला येणार आहे ना आज ?

**बन्सी :** एवढंच ना ? माहीत आहे...

**रमाकाकू :** वासंतीची मैत्रीण म्हणजे कोण समजलास तूं ? एकाद्या भटाभिक्षुकाची पोरगी ? अरे, लक्षाधीश जहागीरदाराची एकुलती एक लाडकी लेक आहे ती !

**बन्सी :** मग ? असेल एवढी श्रीमंत तर आपल्या घरची ! आम्हांला काय त्याचं ?

**रमाकाकू :** मूर्खा ! अक्कल आहे का तुला ? ती येणार तर तिला काय आपलं दैन्य, दारिद्र्य दाखवायचं ? ताईची श्रीमंत मैत्रीण ती. आग्रहानं दहादां बोलावलं तेव्हां कुठं आज कबूल झाली यायला. अन् आज तुम्ही असं अजागळासारखं भिरवाल तर त्यांत शोभा होईल ताईची. समजलं ? ताईची मैत्रीण मोठी फॅशनबाज, श्रीमंताची पोरगी ! आपणहि तिच्याच तोलामोलाचे श्रीमंत, फॅशनबाज आहोंत...

**बन्सी :** असं तिला दाखवायचं होय ?

**रमाकाकू :** अलबत् ! म्हणून तर एवढा जीवाचा आटापिटा चालवलाय्.

**बन्सी :** अस्सं. आतां आलं सारं लक्षांत.

**रमाकाकू :** ( भिंतीवरल्या घड्याळाकडे पाहून ) आलेच चार वाजायला. आत्तां येईल ती...( दार ठोठावल्याचा आवाज ऐकून ) अगबाई ! आलीच वाटतं. ( गोंधळते )

**बन्सी :** दार उघडूं ?

**रमाकाकू :** तूं पळ तोंड धुवायला. मी उघडतें दार. पण ही वासंती कुठं गेली ?

[ बन्सी घरांत जातो. रमाकाकू दार उघडतात.

**रमाकाकू :** ( पाहून हंसत ) इश्श ! तुम्ही होय आवडाबाई ! मला वाटलं...पण या ना आंत. जरा बसा—

**आवडाबाई :** छे, हो ! बसतें कसली ! अश्शी उभी आहे सकाळपास्नं ! क्षणाची फुरसत नाहीं जरा ढुंगण टेकायला कीं लवंडायला. म्हटलं, यावं उभ्या उभ्या चक्कर मारून तुमच्याकडं...

**रमाकाकू :** दारांतच कुठवर उभ्या राहणार ? आल्यासारख्या पांच मिनिटं बसा तरी...

**आवडाबाई :** अजून पोरांचं मधल्या वेळचं खाणं व्हायचं आहे. शिवाय, राजेसाहेब येतील आत्तां हपिसांतून...

**रमाकाकू :** आज रविवारचं हपीस ?

**आवडाबाई :** रविवार असो कीं रविवारचा बाप असो. आमच्या साहेबांना सुट्टी नाहीं. कामांतून सुटका नाहीं. मोठ्ठा साहेब विलायतेला रजेवर गेल्यापास्नं सारं हपीस यांच्याच अंगावर पडलंय् ! पगारांत बढती पण करून गेलाय् साहेब...

**रमाकाकू :** आतां किति मिळतात ?

**आवडाबाई :** मिळतात कीं चांगले...हो पण काय बरं म्हणत होतें मी ...हो खरंच. आमचा राजाभाऊ—

**रमाकाकू :** काय झालं त्यांचं ?

[ आवडाबाई आपल्याच नादांत घरांत प्रवेशते. साफसफाई पाहून चमकते.

**आवडाबाई :** पण कां हो रमाकाकू, कसला बेत आहे आज ? थाट उडवलाय् आज खोलींत...अन् तुम्हीहि बासनांतलं जरीचं बनारसी पातळ नेसलाय् ! कांहीं तरी विशेष दिसतंय् !

**रमाकाकू :** विशेष कसलं कपाळाचं ? आमच्या वासंतीनं आपली एक मैत्रीण आज चहाला बोलावलीय्...

**आवडाबाई :** होका ? हा मेल्यांनों ! तरीच बरं का ? ती वरची आगलाव्यांची ठकी कालच मला सांगत होती...

**रमाकाकू :** म्हणजे ? कालपासूनच साऱ्या चाळींत जाहिराती लागल्यात वाटतं ?

**आवडाबाई :** तुमचा नथू नू बन्सी ! त्यांनींच तर वर्दी पोहोंचविली चहुंकडे. बाकी, बेत फक्कडच दिसतोय्...

**रमाकाकू :** वासंतीसाठीं केलं पाहिजे सारं.

**आवडाबाई :** पण तुमचं करणं तिच्या मनाला येतं ना ? नाहींतर तुम्ही राबायचं तिच्यासाठीं नि तिनं घालायची कपाळाला आंठी !

**रमाकाकू :** आमची वासंती लाखांत पोर आहे ! भारीच साधी, सालस नि सुस्वभावी. नाहींतर आजकालच्या पोरी ! रिकामा नखरा नि गांवभर चकरा !

**आवडाबाई :** हो बाई ! ती खालची आमच्या शेजारची डॉक्टरांची पुष्पाच पहा ना ? नटते काय, मुरडते काय ! जाग्यावर नाहीं नाक पण केवढा दिमाख ! तीन वरसं तिसरींत आहे. पण रुबाब केवढा ! जशी कांहीं कॉले-जांतच शिकतेय् !

**रमाकाकू :** अन् ती साठ्यांची सुमन ! तिचीहि तीच तऱ्हा. जेव्हां पहावं तेव्हां आपली आरशासमोर मुखडा न्याहाळीत उभी ! आमची वासंती तीन बुकं विंग्रजी शिकली पण अजून असला छचोरपणा करीत नाहीं.

**आवडाबाई :** बाळबोध वळणांतल्या मुली ! शिकल्या नि भकल्या असं कध्धीं व्हायचं नाहीं.

**रमाबाई :** आतां जगरहाटीप्रमाणं वागायचं म्हणून वासंतीहि गोल नेसते, वेणीचा शेपटा सोडते...करते सारे ढंग पण तोंडाला पावडर फासत नाहीं कीं ओठाला रंग चोपडीत नाहीं. अन् हुशार तरी किती ! अहो, विंग्रजी सिनेमा समजतो तिला !

**आवडाबाई :** खूप खूप शिकवा तिला...

**रमाबाई :** मनांतनं पुष्कळ आहे पण ऐपत हवी ना ?

**आवडाबाई :** अहो, शिकविल्याखेरीज पोरींना लग्नाच्या बाजारांत भावच येत नाहीं आजकाल. सारंच शिकविलं पाहिजे. नाचणं, गाणं, पोहणं, चित्रं काढणं, एक ना दोन ! हज्जार कला ! एकवेळ सैंपाक करायला येत नसला तरी चालतं पण—

**रमाकाकू :** आमच्या वेळीं असं नव्हतं बाई !

**आवडाबाई :** बाकी, तुमची वासंती मुळांतच चुणचुणीत, चलाख ! खूप कला भरल्यात तिच्या अंगीं !

**रमाकाकू :** गतवर्षी गणपतींत तिनं कसा झकास पुरुषपार्ट केला नाटकांत ! पाहिलांतच तुम्ही.

**आवडाबाई :** आधींच धीट दांडगेश्वर ! त्यांतून हौशी—( घड्याळांत

चाराचे ठोके पडतात. ) अग्गोबाई ! चार वाजले. मी बोलत काय बसलें खुळ्यासारखी...( लगबगीनें जाऊं लागते )

**रमाकाकू :** पण तें पदराखालीं काय झांकून घेतलंय् ?

**आवडाबाई :** हें होय ? ( मोठ्यांदा हसून ) जळ्ळा मेला माझा धांदरटपणा ! सारंच मुसळ केरांत ! म्हणजे मी आलें कशासाठीं नि बोलायच्या नादांत तशीच परत काय चाललें ! हं. घ्या. ठेवा हें. ( एक पुरचुंडी देते )

**रमाबाई :** काय आहे हें ? ( सोडून पहाते ) कांद्याचीं थिरडीं !

**आवडाबाई :** हो ! अहो, तेंच तर मी सांगत होतें मघांशी. आमच्या राजाभाऊनं नवीन 'आरोग्यभुवन' काढलंय् ! नवीन तऱ्हेचे कांहीं खमंग जिन्नस केले कीं तो देतो धाडून माझ्यासाठीं अग्रूपाईनं !

**रमाकाकू :** आज ही थिरड्यांची भेट पाठविली वाटतं लाडक्या बहिणीला ?

**आवडाबाई :** फार खमंग झालींत बघा थिरडीं ! म्हटलं, तुम्हालाहि थोडी चव दाखवावी त्यांची. आमचा राजाभाऊ बरीक खरा डोकेबाज. आत्तांपर्यंत आठ वेळां हाटेलं काढलीं, दिवाळीहि काढलीं. पण धंदा बदलला नाहीं. पुण्याला जम बसेना म्हणून इथं मुंबईला आला नि एका वरसांत तीन हाटेलं तीन ठिकाणीं सुरू केलीं !

**रमाकाकू :** इतका का पैसा मिळतो या धंद्यांत ?

**आवडाबाई :** पैसा ! अहो, हाटेल म्हणजे पैशाची टांकसाळ ! दिवाळं काढलं त्यावर जाऊं नका. दिवाळं नि दिवाळी ! खऱ्या धंदेवाल्याला दोन्हीं सारखींच ! आमच्या राजाभाऊनंच पहा ना ? दिवाळं काढलं खरं पण एका वरसांत शंभर तोळे सोन्यानं पिवळी करून सोडली बायकोला ! मलाहि त्यानं मोत्याच्या बांगड्या घातल्या भाऊबीजेला. मी पण लगेच त्याच्या बायकोला हिऱ्याचा कुडीजोड दिला. भाऊ झाला म्हणून काय झालं ? त्याच्या उपकारांत कां राहायचं उगीच ? अन् मला तरी काय कमी आहे ? ही पहा, कालच नवी आंगठी आणली मी...

**रमाकाकू :** अस्सल हिऱ्याची दिसतेय्...

**आवडाबाई :** दिसतेय् म्हणजे ? तीनशेंचा खडा आहे...नजर ठरत नाहीं असं तेज...बघा ना ? ( बोट नाचविते. इतक्यांत वासंती बाहेरून येते. )

**रमाकाकू :** कुठं ग हिंडत होतीस इतका वेळ ?

**वासंती :** त्या शहाण्यांच्या शरयूकडे गेलें होतें. तिचीं इयरिंग्ज् पाहिलीं. भिक्कार आहेत अगदीं. पण आई, इतक्यांत येईल ती. आटपलं ना तुझं सारं ? ( धिरड्यांकडे पाहून ) अय्या ! अन् हें ग काय इथं टेबलावर ? थालीपीठं ?

**आवडाबाई :** खमंग धिरडीं आहेत हो तीं कांद्याचीं !

**वासंती :** डॅम इट् ! नॉन्सेन्स ! इथं कशाला ही घाण ?

**रमाकाकू :** आत्तांच आणलीं आवडाबाईंनीं...

**आवडाबाई :** तुझ्या त्या मैत्रिणीला खायला दे...

**वासंती :** हीं धिरडीं नि तिला खायला द्यायचीं ! टाळकं फिरलंय् काय तुमचं ? ती खाणार असला घाणेरडा जिन्नस ?

**आवडाबाई :** एवढी कोण आहे ती मिजासखोर ? राजाची राणी कीं तुझ्यासारखीच एखादी नाजूक नखरेल चटकचांदणी ?

**वासंती :** ( फणकाऱ्यानें ) ती कोण आहे ? श्रीमंत सरदारकन्या आहे ती ! नसता तोरा मिरविणारी कुणी कारकुंड्याची बायको नाहीं कीं हॉटेलवाल्याची बहीण नाहीं...

**रमाकाकू :** ( दटावणीच्या स्वरांत ) वासंती !

**आवडाबाई :** बोलूंदे हो तिला. तिच्या बोलण्याचा का मला राग येणार आहे ? वासंती, आमचा राजाभाऊ——

**वासंती :** कान किटले तुमच्या त्या राजाभाऊंचा इतिहास ऐकून ऐकून. त्यांच्याच हॉटेलांतली ही अजब चीज वाटतं ? छाऽऽन !

**आवडाबाई :** उगीच नको नाक उडवूं. खाऊन तर पहा.

**वासंती :** तुम्हीच खा. जा घेऊन परत. कमी पडतील तुम्हाला.

**आवडाबाई :** तुझ्या तोंडाला कुणी लागावं बाई ! ( जाऊं लागते. शांता केळीं घेऊन येते. ) केळीं का विकत आणलीस ? कशाला ? रमाकाकू, तुम्हाला केळीं हवीं होतीं तर मला नाहीं सांगायचं ? अहो, परवांच सबंध लोंगर आणलाय् केळ्यांचा...

**शांता :** मोठ्ठा थोरला घडच्या घड ?

**आवडाबाई :** होय. आमच्या इथं असंच आहे. कोणताहि जिन्नस आणायचा म्हणजे चांगला भरपूर आणायचा. दरिद्र्यासारखा एवढा तेवढा नाहीं. कुजून चाललींत घरीं केळीं. देऊं का आणून तुम्हांला? कचऱ्याच्या पेटींतच फेकून देणार आहे तीं मी. तुमच्या तरी तोंडांत पडतील. आणूं का?

**रमाकाकू :** कांहीं नको आतां.

**आवडाबाई :** संकोच करूं नका. काय हवं, नको, तें खुश्शाल मागत चला. शेजारधर्म म्हटलाय् कशाला? मी बाई मागतें मोकळ्या मनानं हवं तें हवं तिथं. कालचीच गोष्ट. रात्रीं आम्हीं सिनेमाहून आलों नि मला बाई आली कॉफी करून प्यायची लहर. पण घरांत दूध नव्हतं. मग काय? शेजारच्या बर्वीणबाईंना उठविलं झोपेंतून रात्रीं दीड वाजतां दुधासाठीं!

**वासंती :** उत्तम केलंत. तरीच बिऱ्हाडं टिकत नाहींत तुमच्या शेजाराला. कटकटीला कंटाळून...

**आवडाबाई :** तर-तर! केव्हढा टेंभा! तुला कधीं कुणापुढं जसं कांहीं टाऊकच नाहीं हात पसरायचं. हें जॉर्जेटचं पातळ, हा विनबाह्यांचा ब्लाऊज... कुठून आणलंस हें सारं भीक मागून? त्या वरच्या मंदाकडनंच ना? काल माझ्यासमक्ष तर तोंड वेंगाडलंस सत्रादां तिच्यापुढं. कायसं म्हणतात ना? तशांतली गत. आपण हंसे लोकाला नि...

**वासंती :** बरं-बरं-जा आतां. ती येईल आत्तां. तुमची वाजंत्री नको दारांत.

**आवडाबाई :** वा! तिच्या स्वागतासाठीं तर जरूर हवी दारांत वाजंत्री! म्हणे ती येणार! कोण एवढी तालेवाराची लागून गेलीय् ती सटवी! मला पाहिलीच पाहिजे.

**वासंती :** मग बोलावूं तुम्हाला तिला पहायला. ( तेथून दुसरीकडे जाते ) अग शांता, ( पाहून ) खुळे, हें ग काय? सोलून कशाला ठेवतेस केळीं? चल, हो तिकडे—

**आवडाबाई :** ( हलकेंच कानाशीं ) रमाकाकू, तुम्ही वासंतीचं ऐकूं नका. काय लागेल तें मला सांगा. जरा मोठ्यांदा पाय वाजवा म्हणजे झालं. तुमच्या अगदीं खालींच तर आमचं बिऱ्हाड. आवाज ऐकला कीं वरती आलेंच बघा मी धांवत! पाय बरीक जरा जोरानं आपटा हं!

[ जाते.

**वासंती :** टळली पीडा एकदांची ! आई, कशाला ग आली होती ही कोडगी लावसट ? नको तेव्हां नेमकी हजर ! अगदीं थारा देऊन उपयोगी नाहीं तिला.

**रमाकाकू :** अग, मी तिला बोलावणं का पाठविलं होतं ? तीच आली हीं घिरडीं घेऊन घाईघाईनं.

**वासंती :** नेहमीं घाईंतच अ[illegible] लोचट, लुब्री मेली ! दे फेकून तीं घिरडीं...

**रमाकाकू :** असं देत ग. बिचारीनं अगत्यानं आणून दिलींत मुद्दाम—

**वासंती :** खरं म्हणजे ती आली असेल आपली नकली हिऱ्याची आंगठी दाखवायला...

**रमाबाई :** दाखविलीन् खरी आंगठी. पण तुला ग कसं ठाऊक... ?

**वासंती :** कालपासून सारी चाळ हिंडतेय् ना ती ? कांहींतरी निमित्तानं प्रत्येक बिऱ्हाडांत घुसून आंगठीची ऐट दाखवितेय्. बारा आण्यांची खोटी, कांच अन् म्हणे तीनशेंचा खडा !

**रमाकाकू :** असेलहि. कुणी सांगावं ? चांगला चकाकतोय्...

**वासंती :** पण त्या मोतीवाल्यांच्या माईनींच केली की परीक्षा कालच ! सगळ्या बायकांत फजीती झाली तिची. तेव्हां मग पळाली चिमणीएवढा चेहरा करून जळफळत...

**रमाकाकू :** भोळी भाबडी आहे बिचारी !

**वासंती :** तर–तर ! पक्की खट्याळ–खवचट, बनलेली आहे. अन् दुसऱ्याला बनवायला बघते. बोलते कसं नासकं कुजकं ! ढालगज भवानी ! तिला पाहिलं कीं संताप येतो मला. आज तर पाय ठेवूं देतां कामा नये तिला आपल्या घरीं. भलतं सलतं बरळून ऐन वेळीं घात करायची ती बोलभांड बया ! फटकळ तोंडाची फुटाणी ! आमचा साराच व्यूह ढांसळून पाडायची ! माझी मात्र मधल्या मध्यें फुक्कट फजीती व्हायची ! ती आज येणार अन्...

**रमाकाकू :** मी बरी होऊं देईन तुझी फजीती ?

**वासंती :** हो. नाहींतर...नवीनच ओळख झालेली आमची. अन् शिवाय,

तिच्याप्रमाणंच आम्हीहि फार श्रीमंत आहोंत, असंच मी आजवर भासवलंय् तिला... आमची मोटार आहे...चार बंगले आहेत...

**बन्सी :** ( आंतून येत ) विमान आहे...आगगाडी आहे...

**वासंती :** चोंबड्या, गप्प बैस हं ! बजावून ठेवतें, ती आल्यावर जर का असंच मधें तोंड घालशील आमच्या बोलण्यांत तर तोंडच फोडून टाकीन.

**रमाकाकू :** अगदीं काडीची अक्कल नाहीं कारट्याला.

**शांता :** बन्सी, आपणसुद्धां अशी बतावणी केली पाहिजे कीं...

**बन्सी :** यँव् रे यँव् ! पहा तर खरं माझी करामत !

[ नथूला घेऊन वासंतीची मैत्रीण कमल येते.

**वासंती :** कमळे ! आत्तां आलीस ? केव्हांची वाट पहातेंय् मी तुझी ?

**रमाकाकू :** पण हे चिरंजीव कुठं सांपडले ?

**कमल :** पावसांत नाचत होता रस्त्यावर...

**वासंती :** म्हणजे ? पाऊस पडायला लागला ?

**कमल :** म्हणण्यासारखा नाहीं. उगीच चार शिंतोडे...

**वासंती :** इतकं केल्यासारखं ती आली म्हणजे बरं. नाहीं तर पावसाचं निमित्त व्हायचं...

**कमल :** मुसळधार पाऊस कोसळूं लागला तरी ती आल्याशिवाय राहणार नाहीं. काळजी करूं नकोस. अन् मेला पाऊस तरी आहे कुठं एवढा ?

**रमाकाकू :** शांता, या नथूला असाच नळावर घेऊन चल. मघाशींच परटीचे कपडे घातले. इतक्यांत खराब केले कार्ट्यानं...

[ शांता व रमाकाकू नथूला घेऊन आंत जातात. बन्सीहि त्यांच्या पाठोपाठ जातो.

**वासंती :** कमल, काय काय आणलंस ?

**कमल :** तूं सांगितलेलं सगळं आणलंय्. हीं इयरिंग्ज...

**वासंती :** ( आनंदानें ) शाब्बास ! छबूकडूनच आणलीस ना ?

**कमल :** छबू गेलीय् दादरला. मग गांठलं ढमढेऱ्यांच्या बेबीला...

**वासंती :** ओ ! थँक्स ! ( आरशांत पहात कानांत इयरिंग्ज घालते. )

**कमल :** आणखी एक जम्मत आणलीय् तुझ्यासाठीं. ही बघ...

**वासंती :** अय्या ! मोत्यांच्या बांगड्या ! ( हातांत भराभर बांगड्या घालून ) कमा ! कमा ! कित्ती कित्ती चांगली आहेस ग तूं ! तुला अशी कडकडून मिठी मारावीशी वाटते ! ( मिठी मारते ) मी आतां सुंदर दिसतें नाहीं !

**कमल :** अन् या वेण्या नि हा फुलांचा गुच्छ !

**वासंती :** बहार केलीस गडे ! मी तर अगदीं आनंदानं बेहोष झालेंय् !

[ हातांत पुष्पगुच्छ घेऊन पुढील गाणें गात इकडे तिकडे नाचूं लागते.

कशि खुले झुले कलिका ही !
लपुनी छपुनी हळूंच पाही
किति लाजत मुरडत राही !
खुलत न्यारी रंगरसेली नवी नवाळी
वायूसंगें नाचत छुमछुम सुगंध-बाळी
बघ हांसे गोड बाई !

[ गाणें संपतांच मोटरचा हॉर्न ऐकूं येतो. वासंती चपापते.

**वासंती :** ( कमलेस ) अग, आलीच वाटतं ती. बघ-बघ—

[ कमल गॅलरींत जाते. वासंती फुलदाणींत गुच्छ ठेवून एकवार आरशांत डोकावते व चटकन् गॅलरींत पळते.

**वासंती :** तिचीच ना ग मोटार ?

**कमल :** छट् ! कचऱ्याची मोटार ! गेलीसुद्धां ! अन् हात्तेच्या !...

**वासंती :** काय झालं ग ?

**कमल :** ती तर पायींच येत आहे वन् टू करीत !

**वासंती :** कुठं ? पाहूं–पाहूं ( वांकून दूरवर पहाते. )

**कमल :** तीऽऽ बघ ! त्या कोपऱ्यावर !

**वासंती :** अग्ग्या ! खरंच कीं. चल, चल कमल. आलीच ती. ( दोघी पळत घरांत येतात.) आई, अग आई, आली बरं का ती...

[ रमाकाकू, बन्सी, शांता लगबगीनें बाहेर येतात.

**रमाकाकू :** आली ?

**वासंती :** आली म्हणजे काय ? इतक्यांत येईलच. शांता, तूं या खुर्च्या जरा नीट ठेव...अन् बन्सी, ती बाजाची पेटी जरा इकडे पुढं ठेव समोर दिसेल अशी...हीं त्या आवडाबाईचीं घिरडीं जळूं देत इथं या कपाटावर. समोर टेबलावर प्रदर्शन नको... ( कपाटावर घिरड्यांचा पुडा ठेवते. ) अन् कमल, चहाचं तेवढं तूंच सांभाळ हं. आमच्या आईला नाहीं जमत चांगला चहा ...जा झटपट, तूंच स्टोव्ह पेटवून चहा कर फक्कडसा...जा-जा–

**कमल :** ती येऊं दे तरी.

**वासंती :** अग ती आलीच. जा. जा. ठेव आधण. ( कमल जराशा नाराजीनेंच चहा करायला आंत जाते.) अन् आई, तूंहि जरा आंतच बैस. मी मग बोलावीन तुला बाहेर ती आली कीं...

[ चारुबाला येते.

**रमाकाकू :** ह्या आल्याच ! या–या !

**वासंती :** सुस्वागतम् ! नमस्ते !

**चारुबाला :** नमस्ते ! उशीर नाहीं ना झाला ?

**वासंती :** छे ! बरोबर वेळेला आलांत.

**चारुबाला :** मघांच येणार होतें मी. पण मध्येंच मेली पावसाची बुरबुर सुरू झाली. त्यांतून गाडी नाहीं. शोफर आजारी. शेवटीं बसमधून आलें—

**वासंती :** आमची मोटार पाठविणार होतें मी...

**बन्सी :** पण आहेच कुठं मोटार ?

**वासंती :** हो. बाबा घेऊन गेले. त्यांचा एक लंगोटी दोस्त आहे. कलेक्टर आहे म्हणा कुठलासा...त्याच्याकडे चहाला गेले मघांशीच...

**चारुबाला :** दुसरी गाडी आहे आमची. परवांच नवी घेतली बारा हजाराला. पण ती घेऊन पपा गेले गव्हर्नरच्या बंगल्यावर !

**रमाकाकू :** गव्हर्नरच्या बंगल्यावर ?

**चारुबाला :** होय. दर रविवारीं पपांना चहाला बोलावतो गव्हर्नर !

**रमाकाकू :** पण अशा उभ्या कां ? बसा ना !

[ चारुबाला खुर्चीवर बसते. नंतर सर्वजणी बसतात. बन्सी आंतून एक स्टूल आणून त्यावर बसतो.

**वासंती :** आतां आधीं शिष्टाचाराप्रमाणं परस्परांचा परिचय ! ही आमची आई ! अन् आई, या माझ्या मैत्रीण, मिस् चारुबाला सोनापुरे ! ( रमाकाकू व चारुबाला खुर्चीवरून अर्धवट उठून एकमेकींचें हस्तांदोलन करतात ) ही माझी धाकटी बहीण शांता...( शांता नमस्कार करते. )

**बन्सी :** अन् मी बन्सी ! ( चटकन् उठून नमस्कार करतो नि पुन्हां मांडा ठोकून बसतो. सर्वजणी हंसतात. )

**वासंती :** हा माझा धाकटा भाऊ ! आहे जरासा अवखळ—

**बन्सी :** अन् ताई, तूं काय कमी दंगा करतेस ? अजून तर बाबांचीं बोलणीं खातेस अन् मारहि खातेस—

**रमाकाकू :** ( डोळ्यांनीं दटावीत ) वाट्टेल तें बडबडतो गुलाम !

**नथू :** ( आंतून ओरडत येतो ) आई, आतां कसा झकपक झालों बघ. ( तोंड पुसून टावेल रमाकाकूंच्या तोंडावर फेंकतो. )

**रमाकाकू :** ( त्रासून ) ये असा. बैस इथं मुकाट्यानं. ( चारुबालेस ) हा माझा सर्वांत धाकटा मुलगा नथूराम.

**चारुबाला :** लाडकं शेंडेफळ ! ( मोठ्यांदा हंसते. )

**वासंती :** बरं पण आतां मुख्य कार्यक्रमाला सुरवात. शांता, बन्सी, फराळाच्या बशा आणा.

[ शांता व बन्सी टेबलावर शेव, चिवडा, केळीं वगैरे खाद्यपदार्थांच्या बशा आणून ठेवतात.

**चारुबाला :** मला यांतलं कांऽऽहीं नको बाई ! दोन वेळ जेवणाखेरीज

अधेंमधें मी कांहींच खात नसतें. पाणीसुद्धां पीत नसतें. चहालाच म्हणून आलें आहें तेव्हां चहा घेतें घोटभर म्हणजे झालं. खरं म्हणजे चहासुद्धां मी घेत नाहीं कधीं...

**वासंती :** चहा घेत नसाल तर कोको, कॉफी, ओव्हलटाईन—

**चारुवाला :** कांहीं नको. चहाच घेतें थोडासा—

**वासंती :** शांता, जा ग. कमाताईंना म्हणावं, लवकर चहा घेऊन या.

[ शांता जाते.

**चारुबाला :** तुमच्याकडे स्वैंपाकीण आहे वाटतं ?

**रमाकाकू :** तशा एक सोडून दोन आहेत—

**बन्सी :** एक आई नि दुसरी ताई ! ( हंसत हंसत चिवड्याचा बकणा भरतो. वासंती त्याला रागानें हळूंच चिमटा घेते. )

**वासंती :** पण वेळेला दोघीहि हजर नसतात कधीं कधीं. आहेत बरीक गरीब नि सालस.

**रमाकाकू :** उर्मट, चोरट्या नाहींत.

**चारुबाला :** भाग्यवान् आहांत बाई ! आमच्याकडे चार स्वैंपाकिणी आहेत. पण एकाहून एक चढेल नि मग्रूर ! त्यांना आम्ही पगार देऊन नोकरीला ठेवलंय् खरं पण आम्हालाच एकसारखं राबावं लागतं त्यांच्या हाताखालीं. त्यांच्याच तंत्रानं सारं घ्यावं लागतं. एकीकीची मिजास तरी किती ! महाराणीच्या वर !

**रमाकाकू :** चांगले इमानी नोकर मिळायलाहि भाग्यच लागतं.

[ कमल ट्रेमधून चहाचे पेले घेऊन येते. चारुबाला तिच्याकडे पहाते.

**वासंती :** ठेवा इथं ट्रे. तुम्ही जा नि शांताच्या हातीं केक, बिस्किटं धाडून द्या. ( कमल झणकाऱ्यानें जाते. )

**चारुवाला :** छान बाई मिळाली आहे हो तुम्हाला...हुशार नि देखणी !

**रमाकाकू :** स्वैंपाकांत सुग्रण आहे. पण नुकतीच आली आहे. टिकेल तेव्हां खरी. पुष्कळांचा डोळा आहे तिच्यावर.

[ शांता बिस्किटें घेऊन येते.

**वासंती :** ( चारुबालेस ) बिस्किटं घ्या ना ? आमच्या कमाताईनींच घरीं बनविलींत ! कशी छान आहेत !

**चारुबाला :** ( बिस्किट खाऊन ) उत्तमच आहेत. घरीं बनवलीं म्हणतां ?

**बन्सी :** घरीं कुठली बनवलीं ? बाजारांतनं तर सकाळीं आणलीं—

**वासंती :** गप्प बैस. तुला काय ठाऊक ?

**चारुबाला :** बाजारच्या वर भट्टी साधलीय् ? तुमच्या स्वैंपाकिणीनं बनविलीं अं ! ( पुन्हां बिस्किटें खाते. )

**वासंती :** हो. आमच्या कमाताईनीं !

[ कमल बाहेर येऊं लागते पण वासंतीचें बोलणें ऐकून थबकते. मधल्या खोलीच्या दाराशीं कान लावून उभी राहते.

**चारुबाला :** पण तुमची कमाताई कांहीं स्वैंपाकिणीसारखी दिसत नाहीं.

**वासंती :** पहा म्हणजे झालं. मालकीण ही अशी साधीभोळी अन् स्वैंपाकीण मात्र नटवी पुतळी ! आमच्या आईचे खंडीभर दागिने आहेत हिऱ्यामोत्यांचे...

**रमाकाकू :** पण मला बाई दागिन्यांचा तिटकाराच आहे. आमच्या वासंतीचंहि असंच. दिवसांतून दहादां बदलायचे म्हटलं तरी वर्षभर पुरतील इतके उंची, नवे कोरे कपडे आहेत तिचे. हज्जार तऱ्हेचीं पातळं, शालू, पैठण्या; पण हिला आपला नेसायचाच कंटाळा !

**वासंती :** मला साधेपणाच आवडतो. साधी रहाणी नि उच्च विचारसरणी !

**चारुबाला :** हेंच तत्त्व माझंसुद्धां. मला तर खादीच्या पासोड्याच नेसाव्याशा वाटतात !

**वासंती :** ( हंसून ) पण इतमामाला शोभलं पाहिजे ना तें ? कमाताई, थोडं दूध आणा हो. पण नको. आहे इथं...

[ स्वैंपाकघरांत भांड्यांची आदळआपट कमल सुरू करते. ती ऐकून वासंती व रमाकाकू गांगरतात.

**वासंती :** ( हळूंच ) कमळी रागावली वाटतं ?

**रमाकाकू :** आपण तिला स्वैंपाकीण ठरविली...ऐकलं तिनं सारं...

**वासंती :** मग मी काढीन तिची समजूत. रागावूंदे खुश्शाल.

[ इतक्यांत कमल रागारागानें बाहेर येते व चरफडत निघून जाते.

**वासंती :** कमाताई ! अहो कमाताई ! गेल्याच वाटतं ?

**रमाकाकू :** संध्याकाळीं लवकर यायला सांगायचं होतं...

[ चारुबाला चहा संपवून उठते व इकडे तिकडे हिंडते.

**वासंती :** शांता, हें सगळं इथून उचलून ने पाहूं.

[ शांता कपबशा वगैरे उचलून नेते.

**चारुबाला :** किती भिकार जागा आहे ही ! हवेचा बुंद नाहीं अगदीं. कसे राहतां इथं कुणास ठाऊक ! तुमचीच ना ही चाळ ?

**वासंती :** हो, पण सांगितलं ना ? आमच्या मालकीच्या घरांत आम्हीच सध्यां भाडोत्र्यासारखे राहिलों आहोंत. माटुंग्याचा बंगला विकला. वाळकेश्वरच्या बंगल्याची डागडुजी चाललीय्. सगळं फर्निचरहि तिकडंच पडलंय्. तीन चाळी आहेत आमच्या...

**रमाकाकू :** पण साऱ्या भाड्यानं दिलेल्या ! नोटिशीशिवाय भाडेकरूंना काढतां येत नाहीं अन् पावसाळ्यामुळं नोटिसा देतां येत नाहींत. कशीबशी ही जागा मिळविली...

**चारुबाला :** आमचंहि असंच झालंय्. पुण्याला दोन बंगले आहेत जिमखान्यावर, भाड्यानं दिलेले. इथंसुद्धां चार टोलेजंग इमारती आहेत मालकीच्या पण साऱ्या भाड्यानं दिलेल्या ! पपांचा स्वभावच विचित्र ! हक्काचीं घरं भाड्यानं द्यायचीं आणि आपण स्वतः भाड्याच्या घरांत राहायचं. पपा आणखी दोन नवीन बंगले बांधताहेत. एक नव्या वरळीकडे नि दुसरा कुलाब्याकडे. ( बोलतां बोलतां बाजाच्या पेटीकडे तिचें लक्ष जातें. ) हार्मोनियम् वाटतं हा ? ( वाजवूं लागते. ) अय्या ! भाताच फुटलाय् याचा ! खोकं झालंय् नुसतं...

**रमाकाकू :** पोरटीं टिकूं कुठं देतात ? दर महिन्याला नवी पेटी...

**वासंती :** नुकतीच नवी कोरी पेटी आणली, पण पहा कशी दशा करून टाकली हिची ! वाजतसुद्धां नाहीं आतां.

**बन्सी :** मी वाजवितों कीं ! ( चारुबालेस ) तुम्हाला गाणं येतं ना ? ( स्वतांच ओरडूं लागतो ) ' सुनो सुनो बनके प्राणी. ' पाहुणेबाई ! तुम्ही म्हणा ना— ' बनी हूं आज तुम्हारी राणी....

**रमाकाकू :** बन्सी, चूप बैस पाहूं. ऊठ तेथून. हात लावूं नकोस पेटीला.

**बन्सी :** 'अहा ! भारत पियारा'... ( उठून ओरडत नाचूं लागतो. ).

**वासंती :** ( खेकसून ) एऽऽ भारत ! तोंड मिटतोस कीं देऊं हांकलून बाहेर ?

**बन्सी :** नको—नको. गप्प बसतों मी देवासारखा—

**रमाकाकू :** ( चारुबालेस ) देवाचं एखादं गोडसं गाणं तरी म्हणा...

**वासंती :** खरंच गडे ! तें—तें गाणं म्हणा. 'धरूं नको पदर'...

**चारुबाला :** पण नुसतंच कसं बाई हार्मोनियम् शिवाय म्हणायचं ?

**वासंती :** हवी कशाला त्या सैतानाची साथ तुमच्या किन्नरी कंठाला ? म्हणा तसंच.

[ बराच आग्रह करून घेऊन चारुबाला पुढील गाणें म्हणते.

धरूं नको पदर हरी ! सोड सोड !
किति खट्याळ तूं ! तुला जगिं न जोड

धांवत दुडुदुडु अवचित येशी
नाचत खिदळत गळां बिलगशी
अशी कशी लबाडा ! तुझी भलती खोड ?

झर झर सर सर कपिलेची बघ
धार काढुनी बाळा ! लगबग
तुज पाजिन गोरस गोड गोड !

[ शांता, बन्सी, नथू टाळ्या पिटून 'वन्स मोअर' असें ओरडतात. वासंती त्यांना गप्प करते.

**रमाकाकू :** किती गोड गातां हो तुम्ही चारुताई !

**वासंती :** गळ्यांनं सारेच गातात पण तुम्ही तर अगदीं अंतःकरणानं गातां !

**चारुबाला :** भारीच बाई तुम्ही स्तुति करतां ! ( उठते. ) तुमच्याकडे फोनो नाहीं वाटतं ?

**वासंती :** नसायला काय झालं ? एक सोडून दोन आहेत...

**रमाकाकू :** पण जाग्यावर आतां एकसुद्धां नाहीं. एक दुरुस्तीला टाक-लाय्...

**वासंती :** अन् दुसरा पोर्टेबल्...शेजारच्या आबासाहेबांनीं मागून नेलाय्. महिना झाला. फोनो तिकडे नि रेकॉर्ड्सहि तिकडेच !

**चारुबाला :** हाच तर मेला उपद्रव असतो शेजाऱ्यांचा. शेजारधर्माला जागावं म्हटलं तर धर्म करतां कर्म ओढवतं ! घरोघर हाच अनुभव. असाच एकानं आमचा ऑर्गन नेला आहे. पण वरीस झालं तरी परत दिला नाहीं अजून.

**बन्सी :** रेडिओसुद्धां आहे. पण आमच्या इथं नव्हे. शेजारच्या चाळींत !

**वासंती :** आम्हीच तो एकाला बक्षीस देऊन टाकला !

**रमाकाकू :** हो ! आम्हाला आतां घ्यायचा आहे नवा...

**वासंती :** हजाराचा रेडिओग्रॅम !

**चारुबाला :** अस्सं ! ( सहज कपाटाकडे जाऊन ) तुमचं हें कपाट शिसवीचं आहे का हो ?

**वासंती :** आमच्या पणजोबापासून आहे हें कपाट. असलं लांकूड अख्ख्या हिंदुस्थानांत मिळत नाहीं. मुद्दाम विलायतेहून मागविलं होतं म्हणे ! दिसायला देवदारासारखं दिसतंय् पण...

**रमाकाकू :** परवांच त्या शृंगारपुरे जहागीरदारांनीं पांचशेंला मागितलं हें कपाट ! पण चार पिढ्यांची पुराणी वस्तु ही ! आम्ही कशी बरं देणार ?

**चारुबाला :** खरं आहे. जुनं तें सोनं !

[ कपाट पाहतां पाहतां त्यावरचा धिरड्यांचा पुडा चारुबालेच्या हाताला लागतो. तो घेऊन ती उलगडून पाहाते. व ' अय्या ! हें काय ? ' असें किंचाळते.

**वासंती :** ( गोंधळून ) घिरडीं आहेत तीं कांद्याचीं...

**चारुबाला :** इशीशीशी ! इथं कशाला ठेवलींत हीं ?

[ वासंती व रमाकाकू बावचळलेल्या मुद्रेनं एकमेकीकडे पहातात. त्यांना काय सांगावें तें सुचत नाहीं.

**रमाकाकू :** तीं–तीं मुद्दामच...

**शांता :** औषध आहे तें बागुर्ड्यांचं !

**वासंती :** हो–हो ! झुरळांचंच औषध आहे तें !

**चारुबाला :** म्हणजे ?

**शांता :** रात्रीं घरभर पसरून ठेवायचीं हीं घिरडीं ! तेलकट वासानं बागुर्डे जमतात तीं खायला. मग त्यांना झाडणीनं झोडपून मारायचं !

**चारुबाला :** युक्ति पण युक्ति !

**बन्सी :** पाहुणेबाई, तुम्ही खा हवींतर...थोडी चव पहा...तोंडाला पाणी सुटलेलं दिसतंय् ! ( मिस्किलपणानें हंसतो. )

**वासंती :** वात्रटच आहेस !

**चारुबाला :** माझ्या तोंडाला पाणी सुटलंय् खरं. मळमळायलाच लागलंय् मला हा घाणेरडा पदार्थ पाहून...( तोंड वेडेवांकडें करते. )

**रमाकाकू :** मग थोडी लवंगसुपारी...

**चारुबाला :** चिकणी सुपारी द्या असली तर...

**रमाकाकू :** गोणी भरलीय् चिकण्या सुपारीची !

[ लगबगीनें आंतून दोनचार चिकण्या सुपाऱ्या घेऊन येतात.

**बन्सी :** पण फोडणार कशानं ? आडकित्ता गेला बाबांच्या चंचींतून. मी वरवंट्यानं फोडतों—

[ बोलत बोलत धांवत जाऊन बन्सी स्वैंपाकघरांतून वरवंटा आणतो व सुपारी फोडूं लागतो. आवाज ऐकून आवडाबाई खालून ओरडते.

**आवडाबाई :** आल्यें हो आल्यें ! जराऽऽ थांबा ! रमाकाकू, ही आलेंच...

**चारुबाला :** हें कोण ?

**शांता :** ती आमची दुसरी स्वैंपाकीणकाकू...

**बन्सी :** वा आक्का ! स्वैंपाकीणकाकू काय ? त्या तर खालच्या आवडाबाई !

**चारुबाला :** ( वासंतीस ) आवडाबाई कोण ?

**वासंती :** ( मनांत घाबरून पण खोटें हंसून ) आहे एक मासलेवाईक नमुना ! म्हटली तर वेडी, म्हटली तर शहाणी !

**रमाकाकू :** वेडी कशानं म्हणा ! पक्की शहाणी आहे.

**वासंती :** आमच्या चाळींत एक करमणुकीचा विषय आहे तो !

**रमाकाकू :** सदानूकदा स्वतांची बडेजावी मिरवायला हवी असते तिला.

**शांता :** अहो, नवऱ्याला राजेसाहेब अन् मुलग्याला छोटे सरकार म्हणते !

**चारुबाला :** अन् हिचा थाट राणीसाहेबांचा ! होय ना ? ( हंसते. )

**वासंती :** नखरा तर विचारूंच नका. पण गंमत ही, कीं घरीं फाटकीं जुनेरं नेसते नि बाहेर जातांना मात्र सरदारणीचा साजशिणगार करते !

**रमाकाकू :** चार पोरांची आई आहे पण जसं कांहीं नुकतंच बारावं वरीस लागलंय् अस्सं वागते !

**वासंती :** हंसते काय, खिदळते काय, माना काय वेळावते, डोळे काय नाचविते, हातवारे करीत लाडे लाडे बोलते काय, साराच थिल्लर पोरकट-पणा ! अंगांत जणूं बॅटरीच भरलीय् तिच्या !

**शांता :** गॅलेरींतून नाचते, धांवते नि उड्यासुद्धां मारते !

**चारुबाला :** शुद्ध हैदोसखानाच दिसतोय् !

**वासंती :** आहे अगदीं अक्षरशत्रु ! पण विद्वत्तेचा आव मात्र केवढा आणते !

**चारुबाला :** तरी पण स्वभावानं चांगली असेल...

**रमाकाकू :** छे ! मोठ्ठा कळलाव्या न् चहाडवुचका स्वभाव ! अहोरात्र तोंडाची टकळी चालू असते तिची ! मला वाटतं, झोपेंतसुद्धां बडबडत असावी ती !

**वासंती :** तिच्या भावानं म्हणे हाटेल घातलंय् इथं नुकतंच. त्या भावाला एक मुलगी आहे. इंग्रजी शाळेंत शिकतेय् म्हणे ! माती न् धोंडे !

**रमाकाकू :** अष्टौप्रहर त्या आपल्या भावाचं नि भावाच्या पोरीचं पुराण कौतुकानं सांगत असते. ती अश्शीच आहे नि तश्शीच आहे...

**वासंती :** असेल एखादी वेंधळीं, बावळी, अजागळ हिडिंबा ! पण हिला मात्र वाटतं कीं ती रूपानं रंभा उर्वशी, बुद्धीनं महापंडिताच आहे !

**रमाकाकू :** पुढं पुढं करायची, आपण होऊन नव्या नव्या ओळखी पाडायची मोठ्ठी वाईट खोड आहे तिला. आतां जर ती इथं आली तर आपण होऊन तुमच्याशीं बोलेल, ओळख काढील अन् आपला सासरमाहेरचा बडेजाव सांगत सुटेल.

**वासंती :** तिच्या अंगीं एकसुद्धां गुण नाहीं नांव घेण्यासारखा. पण लोकांना नांवं ठेवण्यांत मात्र तरबेज आहे ती ! मी तर तिला दारांतहि उभी करीत नाहीं कधीं.

[ बन्सी पुन्हां वरवंट्यानें सुपारी फोडूं लागतो.

**आवडाबाई :** रमाकाकू, आलें हो...जरा थांबा...

**वासंती :** ( रागानें ) आई, जा ग, तिला म्हणावं आत्तां येऊं नको. यावेळीं आम्ही कामांत आहोंत. नथू, जा रे सांग तिला...

**चारुबाला :** छे ! छे ! येऊंदे तिला. मला तरी एकदां तो नमुना बघून ठेवूं दे की. अनायासें करमणूक...

**रमाकाकू :** ( चाहूल ऐकून ) चूप् ! आलीच वाटतं ती–( उठून दारांत जातात. )

[ आवडाबाई धांदलीनं धांपा टाकीत येते. तिला पाहतांच चारुबाला चमकते. अत्यंत अस्वस्थ होते.

**आवडाबाई :** माफ करा हं रमाकाकू ! जरा उशीर झाला. राजेसाहेब आत्तां असेच हपीसांतून आले. आमच्या छोट्या सरकारांना बरोबर देऊन त्यांना पिटाळलं चौपाटीवर ! म्हटलं, बाहेर इराण्याच्या हाटेलांतच चहा घ्या ! मला आलाय् कंटाळा...दाणदाण दोनदां आवाज ऐकला...तुमची खूण मी ओळखली. पण...

**बन्सी :** अहो ! खूण कसली ? मी सुपारी फोडीत होतों वरवंट्यानं...

**आवडाबाई :** हात् मेल्यांनो ! अस्सं होय ? मला वाटलं, दूधबीध हवं तुम्हाला चहासाठीं. ( बोलतां बोलतां आवडाबाईचें चारुबालेकडे लक्ष जातें. )

अन् ही कोण ? हीच का ती तुमची श्रीमंत पाहुणी ? वासंतीची मैत्रीण ? रांडे-च्यांनों ! चिमेऽऽ ! सटवे ! ( चारुबालेच्या जवळ जाते. )

**वासंती :** ( एकदम पुढें होऊन आडवीत ) दूर व्हा आधीं. बराच गळेपडूपणा आरंभलांत कीं ! कोण चिमी ? यांचं नांव आहे चारुबाला ! नाहीं ओळखतां येत माणूस तर गप्प तरी बसावं...

[ चारुबाला घाबरून कावरीबावरी होते. वासंतीला दूर लोटून आवडाबाई चारुबालेजवळ जाते व तिचा गालगुचा घेते.

**आवडाबाई :** अग कार्टे चिमे ! चारुबाला ग केव्हांपासनं झालीस ? शाळे-तलं नांव वाटतं हें ? कीं सिनेमांत जाऊन पुन्हां बारसं करून घेतलंस ? ( आपादमस्तक न्याहाळून ) काय पण सोंग सजवलंयस् ! सिनेमानटीवर ताण ! कुठून आणलंस हें सारं भीक मागून ? छत्री, पर्स, उंच टांचेचा बूट, कानांत झूल, गोल पातळ, उघडे दंड, तोंडाला सफेती, ओठांना लाली ! वा ग वा !

**चारुबाला :** ( आवडाबाईचा हात दाबीत हळूंच ) आत्याऽऽ ! गप्प ना ?

**रमाकाकू :** आवडाबाई, तुमची नि यांची ओळख आहे वाटतं ?

**आवडाबाई :** ओळख ! हात् मेल्यांनो ! अहो, रमाकाकू, ही आमची चिमी ! राजाभाऊच्या पहिल्या बायकोची मुलगी ! मी तुम्हाला सांगत नव्हतें का ? तीच ही ! इतके दिवस मी बोलावतेंय् दांतांच्या कण्या करून पण टवळी आली नाहीं माझ्या घरीं आणि आज तुमच्याकडे मात्र...

**चारुबाला :** ( रडकुंडीला येऊन ) आत्या ! पुरे ना आतां...तिकडे चल. तुला सारं सांगतें. ( एका बाजूला आवडाबाईला ओढून नेऊन कुजबुजते. )

**आवडाबाई :** ( मोठ्यांदा हंसून ) अस्सं होय ? पण हे नमते चोचले तुला सांगितले होते कुणी ? खोटी बढाई मिरवायची ! ऐका हो रमाकाकू !

**चारुबाला :** मी हॉटेलवाल्याची मुलगी असं समजलं तर ही वासंनी माझा तिरस्कार करील, असं मला वाटलं...

**वासंती :** अन् मी एका गरीब शाळामास्तराची मुलगी असं कळलं तर ही चारुबाला...तुमची चिमी माझी सांवलीसुद्धां घेणार नाहीं असं मला वाटलं...

**आवडाबाई :** म्हणून तुम्ही दोघीहि उसन्या श्रीमंतीची ऐट मिरवून एक-मेकीच्या डोळ्यांत धूळ फेंकीत होतां होय ?

**रमाकाकू :** आवडाबाई, तुम्ही मात्र आम्हां सर्वांच्याच डोळ्यांत झणझणीत अंजन घातलंत !

**आवडाबाई :** बढाई कोण मारीत नाहीं ? सर्वांनाच आपापला मोठेपणा मिरवायची हौस असते. पण त्याला कांहीं मर्यादा हवी.

**रमाकाकू :** देवानं दिलेल्या परिस्थितींतच समाधान मानून राहिलं पाहिजे. गरीबीचामुद्धां प्रामाणिक अभिमान बाळगला पाहिजे...

**आवडाबाई :** अन् खरा मोठेपणा हवा असेल तर खोटा मोठेपणा मिरवायचं सोडून दिलं पाहिजे. हेंच खरं. नाहींतर ही आमची चिमी ! पहा कशी नटली आहे ! पण अंगावरचा एकसुद्धां जिन्नस हिचा स्वतांचा नाहीं. ( हंसत हंसत चारुबालेच्या पाठींत चार दोन धपाटे देते. )

**चारुबाला :** पण आत्या, जरा हळूं...माझ्या पाठीचं असं धिरडं करूं नकोस. ( लाडिकपणानं ) हो खरंच. आत्या ! माझ्यासाठीं एक करशील ?

**आवडाबाई :** एक कां ? लाख करीन. बोल. काय करूं ?

**चारुबाला :** ( जाड पण हलक्या आवाजांत ) मला किनई कांद्याचीं धिरडीं करून खायला दे. कावळे कोकलायला लागलेत पोटांत. सबंध दिवस उपाशी आहे मी...

**आवडाबाई :** उपाशी ? तें कां ? सावत्रपणाचा सपाटा दाखवला वाटतं माईसाहेबांनीं ?

**चारुबाला :** छे ग ! सकाळपासून आहे कुठं मी घरीं ? दिवसभर मैत्रिणींचीं घरं पुजीत हिंडत होतें, हा सगळा शृंगारसाज गोळा करण्यासाठीं !

**आवडाबाई :** शाब्बास ग माझे चिमणे ! धन्य आहे तुझी ! रमाकाकू, द्या बाई तीं धिरडीं इकडे...खाऊं दे हिला. कारटी उपाशी आहे सकाळपासून...

**रमाकाकू :** अन् आमच्या वासंतीला तरी आज कुठं सुचलंय् जेवण ? तिनंहि निर्जळी एकादशीच केलीय्...

**आवडाबाई :** वा ! पण तिला आमची गरीबाघरचीं धिरडीं नाहींत आवडत. केळीं भरपूर आहेत ना ? वासंती, केळींच खात बैस आतां...

[ सर्व हंसतात. वासंती खजील होते. चिडते. भरून आलेले डोळे चोळूं लागते.

**रमाकाकू :** बाळ, काय गेलं डोळ्यांत !

**आवडाबाई :** धूळ ! दुसरं काय ?

[ आवडाबाई हंसत हंसत चारुबालेच्या हातीं धिरड्यांची बशी देते व वासंतीच्या हातांत केळीं कोंबते. वासंती जास्तच फणफणते.

**चारुबाला :** वासंती !

[ जवळ जाऊन तिच्या गळ्यांत हात टाकते. पडदा पडतो.



## पात्रें :

[ प्रवेशाच्या अनुक्रमानें ]

बाबी
बबन
दया
विजया
बाबूराव
विद्याधर
नारोपंत
रावसाहेब

---

**प्रवेश पहिला :** जून महिन्यांतील दुसरा आठवडा. दुपारची वेळ. माटुंगा येथील नारोपंत नवलाखे यांच्या बंगल्यांतील माडीवरील एक दालन.

**प्रवेश दुसरा :** महिन्यानंतरचा काळ. संध्याकाळचा सातचा सुमार. मरीन ड्राईव्ह.

**प्रवेश तिसरा :** आणखी सहा महिन्यांनीं.

**प्रवेश चौथा :** त्यानंतर एका आठवड्यानें. रावसाहेबांचे बंगल्यांतील दिवाणखाना.

---

# शिकलेले शहाणे !

बाबी व बबन फोनोवर रेकॉर्डस् लावण्यांत गुंतलीं आहेत. इतक्यांत दया व विजया येतात.

**दया :** विजये, म्हण ना ग तें गाणं ? किति आग्रह करून घेतेस ?

**विजया :** अग कसलं गाणं ?

**दया :** मघाशीं गुणगुणत होतीस की...विद्याधरांनींच तें रचलंय् म्हणालीस ना ?

**विजया :** अन् म्हणून तूं एवढी अधीर झालीस वाटतं ऐकायला ?

**दया :** चावटपणा पुरे हं. म्हणतेस कीं नाहीं ? एकदां सांग...

**विजया :** उद्यां !

**दया :** उद्यांची बात नको...

[ 'कशाला उद्यांची बात' या गाण्याचें रेकॉर्ड लावून बाबी व बबन ओरडत नाचतात. विजया गाणें गुणगुणूं लागते.

**दया :** म्हणजे ? याच चालीवर आहे वाटतं तें गाणं ?

**विजया :** हो.

**दया :** मग मोठ्यांदा म्हण ना ! बबन्या, बंद कर तो फोनो. उठल्या सुटल्या फोनो ! उद्योग नाहीं दुसरा...

[ दया स्वतांच फोनो बंद करते.

**बबन व बावी :** हें ग काय ? आक्का !

**दया :** विजूताई किनी गाणं म्हणतेय. ऐका. बावी, ती पेटी घे इकडे...

**बबन :** मी तबला वाजवितों. बाबी, माझ्या तबल्याबरोबर तुझी पेटी लाव. पांढरी पांच...नव्हे, काळी दोन ! विजूताई, बागेश्रीच्या ठेक्यांत गोडसा केरवा म्हणा...

[ बबन तबला बडवूं लागतो.

**दया :** कळली तुझी अक्कल. ठेव तो तबला तिकडे...

**बावी :** बायकांत पुरुष चोंबडा नि भाजून खातो कोंबडा !

**बबन :** व्यरं-ब्यरं आजीबाई !

**दया :** मुकाट्यानं बसा नाहीं तर चालते व्हा पाहूं येथून...( विजयेस ) हं. ही पेटी...

**विजया :** भारीच बाई तूं तरी !

[ विजया पुढील गाणें पेटीवर वाजवून म्हणते. गाणें चालू असतां बाबूराव पुस्तक वाचीत येतो व मागें ऐकत उभा राहतो.

बघ जीवन-रणसंग्राम
उसळला घोर अ-विराम !
चल ऊठ गड्या ! झडकरी
कां सुचे रुचे आराम ?

धरूं सुपथ नवा
वरूं यश–विभवा
करूं चिरंजीव जगीं नाम !
संकटांचा पहाड चढूंया ! लढूंया !
बनवूं शांतिसौख्याचें संतत शुभ धाम
जीवित अभिराम
कर्मयोग निष्काम !
क्रांतिध्वज उभवूं ठाम !
हा जीवन-रणसंग्राम
उसळला घोर अ-विराम !

**दया :** किती छान आहे ग गाणं !

**बाबूराव :** ( पुढें येऊन ) फारच सुंदर ! विद्याधरानं रचलंय् ना ? ( हंसतो. )

**दया :** अन् या विजूनं तें म्हटलं ना गोड गळ्यानं ? म्हणून तर तूं तारीफ करायला पुढं सरसावलास !

[ बाबी व बबन पेटीतबला वाजवून गोंधळ माजवितात.

**बाबूराव :** अरे, काय मांडलाय् हा धिंगाणा ! डोकं उठलं कीं...

**बाबी व बबन :** दादा ! 'हा जीवनरणसंग्राम...' ( ओरडत नाचतात. )

**बाबूराव :** छे ! छे ! पिसाळून सोडलं या पोरट्यांनीं. तुमचं संग्रामगीत चालूंदे बाहेर रस्त्यावर...चला, नीघा येथून...घराचा अगदीं बँडस्टँड झालाय् ! जरा कुठं वाचीत बसेन म्हटलं तर निवांतपणा नाहीं. तिकडे त्या छबीचा तो पाळण्यांतला जलसा तर इकडे हा संगीतकल्लोळ !

**दया :** तूं आपली खोली सोडून इकडे आलासच कां ? विजूचं गाणं ऐकायलाच ना ?

**बाबूराव :** दये ! फार वाढला तुझा चहाटळपणा. मी निघालोंय् बाहेर....

**दया :** अग्गया ! आमचे दादाराव खरंच रागावले हं ! पण दादोबा, कसलं एवढं लठ्ठ पुस्तक वाचतोयस् ? परीक्षेच्या दिवसांतसुद्धां तुझ्या हातांत कधींच पुस्तक दिसलं नाहीं. ( हंसते. )

**बाबूराव :** दांत काय काढतेस ? पोरं जमवून भलत्याच वेळीं गाणं बजावणं ? मेळा काढणार आहेस वाटतं लहान मुलांचा ?

**दया :** मेळा नव्हे...म्युझिक् सर्कल !

**बाबूराव :** म्हणजे ? संगीताचं वाटोळं ? छाऽऽन !

**विजया :** पण आतां युनिव्हर्सिटीच्यासुद्धां अभ्यासक्रमांत संगीत घुसणार आहे म्हणे !

**दया :** मग मात्र आमचा दादा खात्रीनं बी. ए. होईल. कारण, तसा तो पट्टीचा बाथरूम-सिंगर आहे. अन् संगीताच्या जोडीला जेवणाचे नि झोपेचे चार चार पेपर ठेवले तर मग काय बहारच ! फर्स्टक्लास...ऑनर्स मिळवील !

**विजया :** हो पण आजच बी. ए. चा रिझल्ट ! भाऊ येईलच इथं इतक्यांत...

**दया :** कशाला ? दादाबरोबर रिझल्ट पहायला जाण्यासाठीं ?

**विजया :** हो ! सकाळींच तो इकडं दादरला आलाय्...

**बाबूराव :** पण आत्तांच मुद्दाम जाऊन काय पहायचा रिझल्ट ? कळेल नंतर आपोआप...

**दया :** तुझा रिझल्ट नंतरच कळायचा. तूं किती नि कोणत्या विषयांत नापास झालास तें आजच कसं कळणार ? पण विद्याधरांना कोणता क्लास मिळालाय् तें नको कळायला ?

**विजया :** घोडामैदान जवळच आहे आतां...

**बाबूराव :** युनिव्हर्सिटीची परीक्षा म्हणजे डर्बीची रेस !

**दया :** पण या रेसमध्यें तूं विन् तर नाहींच नाहीं पण प्लेससुद्धां येण्याची मारामार ! सालाबादप्रमाणंच नोव्हेअर !

**बाबूराव :** कुणी सांगावं ? एखादेवेळीं माझाच घोडा फ्ल्यूक यायचा...

[ विद्याधर येतो.

**विद्याधर :** अन् आमचं घोडं मध्येंच पेंड खायचं !

**बाबूराव :** हॅलो कॉम्रेड् ! देअर यू आर !

**विद्याधर :** आपण नेहमीं पहातोंच ना चमत्कार ? किती तरी हुषार, मेहनती स्कॉलर्स फेल होतात...

**बाबूराव :** अन् माझ्यासारखे गणंग पास होतात !

**दया :** मग इतक्या दिवसांत कुठं घडला नाहीं असा चमत्कार तुझ्या बाबतींत ? यंदाची ही तुझी सातवी खेप...

**बाबूराव :** मग काय पहिल्याच खेपेला पास होऊन कॉलेजच्या नंदनवनांतून पसार व्हायचं ? हम्बक् ! सिंपली स्टुपिड !

**विद्याधर :** ( हंसून ) खरं आहे. पण इतक्या वेळां बी. ए. ला बसण्याऐवजीं तूं जर म्युनिसिपल इलेक्शनला उभा राहिला असतास तर एव्हांना एकदां तरी खास निवडून आला असतास !

**दया :** कदाचित् प्रेसिडेंटसुद्धां झाला असतास ! मी चवथींत होतें त्यावेळीं तूं पहिल्यांदा बी. ए. ला बसलास. पण मी मॅट्रिक झालें तरी तूं होतोच आहेस अजून बी. ए. !

**विद्याधर :** तुम्ही बहीणभाऊ आतां एकदमच ग्रॅज्यूएट होणार !

**बाबूराव :** अरे, आजच माझ्या नांवापुढं डिग्री झळकणार !

**विद्याधर :** ब्रेव्हो !

**विजया :** ‘ आंतला आवाज ’ बरं का हा !

**बाबूराव :** आत्तांच माझ्या डोळ्यापुढं ‘ नवा प्रकाश ’ नाचूं लागलाय्.

**दया :** जराशानं काजवे नाचूं लागतील !

**बाबूराव :** बराय् ! रिझल्ट लागूं दे. मगच सांगतों एकेकाला...

**विद्याधर :** दांडग्या होप्स् आहेत !

**विजया :** पेपर्स फारच चांगले गेलेले दिसतात.

**बाबूराव :** पेपर्स गेलेत नेहमींप्रमाणंच जायचे तसे. पण गेलेले पेपर्स नव्हे तर माझ्या राशीला आलेले शुभग्रहच संदेश देताहेत...

**दया :** कीं आज आमचे बाबूराव पास होणार !

**बाबूराव :** थट्टा वाटते तुला? एका प्रख्यात होराभूषणानंच प्रतिज्ञेवर सांगितलंय्...

**दया :** म्हणून तूं असा होरा बांधतोस होय?

**विद्याधर :** पण ग्रहांचाच आग्रह असल्यावर युनिव्हर्सिटी देवतेचा अनुग्रह कां नाहीं होणार? ( विद्याधर बाबूरावाच्या हातांतलें पुस्तक घेऊन सहज चाळतो ) अरे! पण बाबू, हें रे काय? नांवापुढं बी. ए. अपॉन टू! म्हणजे?

**बाबूराव :** अंडरग्रॅज्यूएट! अर्धा बी. ए.!

**विद्याधर :** कीं अर्धवट बी. ए.?

**दया :** बी. ए. झाला तरी अर्धवटच!

**बाबूराव :** दये! जा पाहूं येथून...

**दया :** कां? तुझ्या अभिनंदनाची तयारी करायला?

**विद्याधर :** ( मनगटावरील घड्याळांत पाहून ) बाबू, खरंच, चल–चल लवकर. रिझल्ट तर पाहून येऊं...

**बाबूराव :** पहायला नकोच... रिझल्ट ठरलेला!

**दया :** चल विजू! पेढे, हारतुरे तयार ठेवूं...

**विजया :** अन् पंचारती नको का?

**बाबूराव :** वा! विजयी वीराला ओवाळायला पंचारती तर अवश्य हवी.

**विद्याधर :** अहो वीर! चला आतां. रिझल्ट पहायच्या आधींच—

**दया :** पंचारत्या ओंवाळून घेणार वाटतं?

[ दया व विजया हंसत हंसत जातात. विद्याधर व बाबुराव बाहेर जाऊं लागतात. तोंच नारोपंत बाहेरून येतात.

**नारोपंत :** काय विद्याधर! कुठं? रिझल्ट पहायला? अरे, पण रावसाहेबाचा फोन येईलच कीं आत्तां...कालच मी सांगून ठेवलंय् त्याला. बाकी, तुला उत्कंठा असणं साहजिक आहे. बाबूला मात्र, आज निकाल आहे, हेंहि माहित नसेल.

[ बोलत बोलत कोट, उपरणें, पगडी काढून खुंटाळ्याला अडकवितात.

**विद्याधर :** वा! असं कसं होईल?

**बाबूराव :** आज तर माझी खात्री आहे...

**नारोपंत :** पण माझीहि खात्रीच आहे, मागील पानावरून पुढें चालू!

**विद्याधर :** नेम नाहीं! युनिव्हर्सिटीची परीक्षा म्हणजे दैवाचीच परीक्षा...

**नारोपंत :** अरे! दैवाचा हात हवाच प्रत्येक बाबतींत. पण प्रयत्नांची जोड नको का त्याला? माझंच घे ना? सुरवातीला मी फेरीवाल्याचा पेशा पत्करला. खांद्यावर सतरंज्या टाकून चाळीचाळींतून हिंडलों. प्रयत्नांची पराकाष्ठा केली...

**विद्याधर :** अन् रंकाचे राव झालांत! खरं आहे. व्यापारधंद्यांत पैसा आहे...

**नारोपंत :** अन् पैसा हाच परमेश्वर आहे! आरामशीर आर्टस्कोर्स घेऊन पदव्यांचे टिळे कपाळीं चिकटविल्यानं का कुठं कपाळींच्या भाग्यरेषा उमटतात? भाराभर पदव्यांचीं शेंपटें जोडून घेतात हे नंदीबैल! पण स्वतांचं तरी पोट भरण्याची अक्कल यांच्या अंगीं येते का? म्हणजे मी पदव्यांचं किंवा उच्च शिक्षणाचं महत्त्व जाणत नाहीं, असं मात्र नव्हे हो! पण व्यवहारांत कुचकामी ठरणारं शिक्षण केवळ पदवीच्या हव्यासानं घेत बसायचं; आयुष्य, पैसा, प्रकृति यांची नासाडी करायची. त्यापेक्षां उपयुक्त धंदेशिक्षणांत लक्ष घालून मध्यमस्थितींतल्या माणसानं हरहुन्नरी बनावं आणि सध्यांच्या धकाधकीच्या मामल्यांत प्रथम पोटाचा प्रश्न सोडवावा, हेंच श्रेयस्कर नव्हे का? पण आम्ही पडलों बोलून चालून पांढरपेशे! हाताशीं येईल तो हलका सलका धंदा करायला लाज वाटते आम्हाला. शाळा-कॉलेजांत शीक आणि नोकरीला जिणें वीक! हें आमचं ध्येय!

**विद्याधर :** माझीच गोष्ट घ्या. प्रथमपासूनच माझा ओढा व्यापारधंद्याकडं पण मी पदवीधर होऊन सरकारी नोकरींत जन्म काढावा, अशी बाबांची इच्छा!

**नारोपंत :** तो स्वतां आहे ना बडा सरकारी ऑफीसर? रावसाहेब, पदवीधर! म्हणजे काय मौज आहे पहा! केवळ वडिलांची इच्छा म्हणून तूं स्वतांच्या इच्छेविरुद्ध या पदवीच्या फंदांत पडला आहेस! अन् केवळ स्वतांची हौस म्हणून हा बाबू माझ्या मर्जीविरुद्ध बी. ए. च्या वाऱ्या करीत बसलाय्! एकदांचा सुटला म्हणजे मिळविली...

[ टेलिफोनची घंटा वाजूं लागते.

**नारोपंत :** बाबू, फोन घे...बघ कुणाचा तो...बहुतेक रावसाहेबाचाच...

**बाबूराव :** हॅलो ! हॅलो...कोण ? रावसाहेब ? हो...मी बाबू...खरंच ? थँक् गॉड !...अन् विद्याधर... ? ...भलतंच ? ...हॅलो...हॅलो...

[ रिसीव्हर जाग्यावर ठेवून बाबूराव मोठ्यांदा हंसत सुटतो.

हाः हाः हाः ! अहो, माझं अभिनंदन करा ! अग दया ! आधीं पेढे आण...हारतुरे आण...

[ दया व विजया घाईघाईनं येतात.

**नारोपंत :** अरे, काय झालं एवढं खिदाळायला ? नापास झालास म्हणून तुझं टाळकं फिरलं ?...

**दया :** कीं पास झालास म्हणून हर्षवायु झालाय् तुला ?

**बाबूराव :** जय युनिव्हर्सिटी देवते ! नवसाला पावलीस ग बये ! ( हंसतो )

**दया :** दादा, पास झालास वाटतं ?

**बाबूराव :** ओ यस् ! बी. ए. झालों...पदवीधर झालों...

**नारोपंत :** मोक्ष मिळविलास ! इतक्या वेळां युनिव्हर्सिटीच्या उंबरठ्यावर कपाळमोक्ष करून घेतां घेतां...

**दया :** पण बाबू, विद्याधरांचा काय निकाल...

**बाबूराव :** निकाल कसला ? निक्कालच लागला त्याचा !

**विजया :** कोणता क्लास मिळाला भाऊला ?

**बाबूराव :** फोर्थ क्लास ! थर्ड क्लाससुद्धां नाहीं !

**विजया :** म्हणजे ? नापास झाला भाऊ ?

**नारोपंत :** अशक्य ! यानं नीट ऐकलं नसेल—

**बाबूराव :** दोन्ही कान उघडे ठेवून ऐकलं !

**दया :** रावसाहेबांनीं थट्टा केली असेल...

**विद्याधर :** दुर्दैवानंच माझी थट्टा आरंभलेली दिसते !

**नारोपंत :** बाबू पास व्हावा हें एक आश्चर्यच. पण त्याहून अधिक आश्चर्य म्हणजे तूं नापास व्हावंस ! पुन्हां फोन करतों—

**विद्याधर :** कशाला ? असल्या अशुभ वार्ता कधींच खोट्या ठरत नसतात.

**नारोपंत :** हॅलो...रावसाहेब सहस्रबुद्धे आहेत का ?...आतांच गेले ऑफी-मांतून ? अच्छा ! थँक्स् !...( टेलिफोन बंद करून ) विद्याधर, मी झटपट जेवण उरकतों. अन् मग आपण स्वतांच जाऊन चक्षुर्वैसत्यं करूंया...

[ नारोपंत जातात. विद्याधर सचिंत खिन्न मुद्रेनें खुर्चीवर बसतो—

**बाबूराव :** विद्याधर, डरना मत् ! अरे, चढेल तो पडेल ! त्यांत एवढं काय वाईट वाटून घेतोस ? बेस्ट लक् नेक्स्ट टाईम ! जन्माला आलेला प्राणी आयुष्यांत एकदां तरी नापास व्हायचाच.

**दया :** ( विजयेस ) दोन बोटं स्वर्ग उरलाय् दादाला. पास झाला ना ?

**विजया :** पण आतां भाऊला मात्र स्वर्गांतच धाडायला बाबा तयार होतील...( जवळ जाऊन ) भाऊ, प्रयत्न करणं आपल्या हातीं...

**दया :** यश येणं ईशेच्छेवरती !

**बाबूराव :** अर्थात् ! अरे, हिंमत मर्दा तो मदत खुदा ! युनिव्हर्सिटी आहे, वर्षांतून दोनदां परीक्षा आहे, अन् मुख्य म्हणजे आपण स्वतां ह्यात आहोंत तोंपर्यंत काय काळजी आहे ? मुंबई—मद्रास—कलकत्ता—नागपूर अलाहा-बाद...कितीतरी विश्वविद्यालयं अन् कितीतरी कॉलेजं ! इथं नाहीं तिथं, आज नाहीं, दहा वर्षांनीं कुठंतरी, कसातरी पण तूं बी. ए. होशीलच होशील !

**दया :** ( रागानं ) दादा ! फार सैल सुटली तुझी जिभली ! यशाच्या कैफानं एवढा बेफाम झालास ? मोठ्ठं तत्त्वज्ञान शिकवायला लागलास दुसऱ्यांना ?

**बाबूराव :** अग याचंच तत्त्वज्ञान याला पाजवतोंय् ! 'जीवन-रणसंग्राम ! उसळला घोर अ—विराम !' विद्याधर, 'कर्मयोग निष्काम ! क्रांतिध्वज उभवूं ठाम !' तुझाच हा संदेश ! हा साडेतीन हात मूर्तिमंत निष्काम कर्मयोग तुझ्यापुढं उभा आहे पहा ! अरे, तूं एकदांच नापास झालास ! पण हा कट्टा कर्मयोगी पहा ! लागोपाठ सात वेळां फेल्यूअरचं भयंकर हलाहल पचवून पुन्हां जशाचा तसा आहे ! अभंग आणि अढळ ! निष्काम कर्मयोग ! कर्म करीत राहायचं ! फळाची अपेक्षाच धरायची नाहीं. परीक्षेला बसायचं ! पास-नापासाची पर्वाच करायची नाहीं. एका फेल्यूअरनं घायाळून हताशपणें कपाळ धरून बसतोस ? अरे, परीक्षेचं नाटक चाललंच आहे. वन्स मोअर !

**विद्याधर :** परीक्षा ? एक्झॅमिनेशन् ! आतां एकच पोस्टमार्टेम एक्झॅमिनेशन् !

**बाबूराव :** हत् वेड्या ! बायकासारखी जीव देण्याची भाषा बोलतोस !

**दया :** दादा ! तोंड बंद कर. मोठा विद्वान् आहेस ठाऊक आहे.

**बाबूराव :** विद्वान् म्हणजे ? कोरा करकरीत बी. ए. आहें !

**दया :** काय आतां गगनाला गवसणी घालशील तें दिसेलच.

**विजया :** भाऊ, चल घरीं जाऊं...

**विद्याधर :** मी नाहीं घरीं येत.

**विजया :** मग जाणार कुणीकडे ?

**विद्याधर :** दुर्दैव नेईल तिकडे ! ( डोळे पुसूं लागतो. )

**विजया :** भाऊ ! हें काय असं वेड्यासारखं ! चल मुकाट्यानं घरीं.

**दया :** विजू, चहा घेतल्याखेरीज जायचं नाहीं हं. चला, आधीं चहा घ्या...

**विद्याधर :** भलत्या वेळीं कसला चहा ? ( उठतो. )

[ दया, विजया व विद्याधर जातात. बाबूराव शीळ घालीत आरशासमोर कंगव्यानें केंस साफ करीत उभा राहतो. इतक्यांत रावसाहेब सहस्रबुद्धे दाणदाण जिना चढून रागारागानें येतात. बाबूराव चमकून त्यांच्याकडे पहातो.

**बाबुराव :** कोण ? रावसाहेब !

**रावसाहेब :** कुठं आहे विद्याधर ? ( हॅट काढून टेबलावर आदळतात. )

**बाबूराव :** आत्ता इथं होता. गेला वाटतं घरीं...

**रावसाहेब :** घरीं गेला ? घरीं जायला लाज कशी वाटली नाहीं गधड्याला ? आपण नापास झाला पण माझ्या तोंडाला डांबर फासलं कार्ट्यानं !

**बाबूराव :** बसा, रावसाहेब, आधीं या आरामखुर्चीवर बसा...शांत व्हा.

**रावसाहेब :** बाबू, काय सांगूं ? लाही लाही झालीय् अंगाची. ऑफिसांत काम सुचेना, बसवेनासुद्धां ! तडक निघून आलों—

**बाबूराव :** तें बरं केलंत. पण रावसाहेब, विद्याधर आजवर कधींच नापास झालेला नाहीं कुठल्याहि परीक्षेंत...

**रावसाहेब :** अरे, होय; म्हणून तर आज माझ्या मनाला जोराचा धक्का बसून दुप्पट दुःख होतंय्. तो नेहमींच नापास होत राहता तर आशेला जागाच नव्हती. अर्थात् निराशेचंहि कारण नव्हतं.

**बाबूराव :** तेंहि खरंच. रोज मरे त्याला कोण रडे? पण एकदां नापास होणं क्षम्य आहे. तुम्हाला वाईट वाटणंहि साहजिक आहे. आमच्यासारख्या तिऱ्हाइतांनासुद्धां मनस्वी वाईट वाटतंय्. पण करणार काय? ईश्वरी इच्छेपुढं इलाज नाहीं. विद्याधरालासुद्धां दांडगा शॉक बसलाय्.

**रावसाहेब :** पक्का बेरड आहे तो. त्याला कसली खंत? बापाच्या पैशावर मजा मारीत जिवाची मुंबई करणारा खुशालचेंडू, पाजी पोरटा! बाबूराव, यश सुखासुखी मिळत नाहीं. प्रयत्न करावा लागतो. तुझीच गोष्ट घे. कसून अभ्यास केलास म्हणूनच यंदा पास झालास ना? फिकीर नाहीं सात वेळां नापास झालास तरी! याचंच नांव चिकाटी, दीर्घोद्योग, विद्येची अनिवार हौस, उज्ज्वल ध्येयनिष्ठा...

[ दया व विजया येऊं लागतात. परंतु रावसाहेबांना पाहून दारांतच थबकतात.

**दया :** माती न् धोंडे! पाहिलंस विजू, जगाचा न्याय कसा आंधळा आहे! उभ्या आयुष्यांत चुकून कुठं एकदां विद्याधर नापास झाले तर रावसाहेबांनीं रुद्रावतार धारण करून केवढा त्यांच्यावर गहजब चालविलाय्! अन् सात वेळां टकरा खातां खातां आज दादा सुदैवानं पास झालाय् तर केवढा त्याचा गुणगौरव! म्हणे दीर्घोद्योग, चिकाटी...केवढे आरोप सद्गुणांचे!

**विजया :** जगाची रीतच ही! ज्याला यश त्यालाच सारं जग वश!

[ दया व विजया जातात.

**रावसाहेब :** बाबू, तुझ्या नखाची सर येणार नाहीं आमच्या त्या दगडो-बाला! झाला असता आज ग्रॅज्यूएट् तर ताबडतोब नसता दिला चिकटवून कुठंतरी ऑफिसरच्या जागेवर? पण ही हौस आम्हालाच. त्याला काय दरवेशाला! मोठेपणा मिळवायला प्रचंड कर्तबगारी गाजवावी लागते. कष्ट करावे लागतात...

**बाबूराव :** एक्झॅक्टली ! कष्टाशिवाय फळ नाहीं. 'केल्यानें होत आहे रे ! आधीं केलेंच पाहिजे '...रामदासांनींच सांगितलंय् ना ?

**रावसाहेब :** आम्ही कांहीं उपजतच रावबहादूर नव्हतों. मोठ्या कष्टानं गरीबींतून डोकं वर काढलं आम्ही ! कसं तें आमचं आम्हाला ठाऊक ! घरोघर भिक्षांदेहि केली, दारोदार भीक मागितली, अर्धपोटींच काय, पण कधीं कधीं अगदीं उपाशीपोटीं राहून अभ्यास केला बरं आम्ही !

**बाबूराव :** धन्य ! धन्य !

**रावसाहेब :** मला आठवतंय्. दोन महिने वार मिळालें नाहींत तर नुसत्या पाण्यावर जीव जगवून अभ्यास केला बरं !

**बाबूराव :** वाहवा ! वाहवा ! हें खरं पाणी !

**रावसाहेब :** म्युनिसिपालिटीच्या कंदिलाच्या उजेडांत रात्रभर रस्त्यावर उभं राहून पुस्तकं वाचलीं ! असे कष्ट काढले त्यावेळीं...

**बाबूराव :** म्हणून तर आज असा तुमच्या विद्वत्तेचा उजेड पडलाय् जगांत !

**रावसाहेब :** रक्ताचं पाणी करून रात्रंदिवस राबलों म्हणूनच आज आम्ही असे रावसाहेब झालों ! उगीच नाहीं या पदवीला चढलों. तपश्चर्याच तशी केली. साधा ग्रॅज्यूएट् आहें मी ! पण आजकालच्या कोणत्याहि फर्स्ट क्लास डबल ग्रॅज्यूएटच्या तोंडांत मारण्याइतकी माझी विद्वत्ता आहे !

**बाबूराव :** असणारच. पहिल्या काळचे ग्रॅज्यूएट् तुम्ही !

**रावसाहेब :** नाहींतर तुम्ही आजकालचे शेळपट बी. ए. ! व्याकरणशुद्ध इंग्रजीच्या चार ओळी सरळ लिहितां येत नाहींत तुम्हाला, कीं नोकरीसाठीं अर्ज कसा खरडायचा तें कळत नाहीं ! आमची ज्ञानलालसाहि तशीच प्रखर ! आमचं आमरण विद्यार्थीव्रत सुरूच ! नाहींतर तुम्ही ! एकदां पदव्यांचे शिक्के कपाळीं ठोकून घेतले कीं सरस्वतीदेवीला कायमचा सलाम करून मोकळे !

**बाबूराव :** माझं तत्त्व तसं नाहीं हं ! अखंड विद्यार्थीदशा कंठीत जन्मभर परीक्षाच देत राहण्याची माझी महत्त्वाकांक्षा आहे ! कमीत कमी दोन डझन तरी पदव्या मरतांना नांवापुढं लागल्या पाहिजेत !

**रावसाहेब :** शाब्बास ! याचं नांव ध्येय ! नाहींतर तो आमचा उनाडटप्पू !

[ विद्याधर बाहेर येऊं लागतो. विजया त्याला अडविते. पण तो निर्भयपणें येतोच.

**बाबूराव :** अरे वा ! विद्याधर आहे कीं इथंच...

**रावसाहेब :** काय रे विद्याधर, इकडे ये. असा समोर उभा रहा. नापास कसा झालास ? बोल.

**विद्याधर :** मला काय माहीत ?

**रावसाहेब :** मग काय मला माहीत ? अभ्यास तूं केलास कीं मी ?

**बाबूराव :** अभ्यासावर काय आहे ? सध्यांची परीक्षेची रीत नि अभ्यासक्रमच चमत्कारिक आहे, रावसाहेब !

**रावसाहेब :** हें तूं मला शिकवितोस ? तुम्हाला अभ्यास करायला नको. कॉलेजांत जाऊन नसते धंदे करायला हवेत. नाटकं, स्पोर्टस्, वाङ्मयचर्चा मंडळं, संमेलनं ! शिवाय जोडीला केरम, गप्पाष्टकं, सिनेमा...हज्जार धंदे तुमचे ! शिक्षणक्रमाच्या नांवानं कां कोकलतां ? आमच्या वेळेपेक्षां कितीतरी सोपा, सुटसुटीत आहे सध्यांचा शिक्षणक्रम ! अन् सवलती तरी किती ! पण पालकांच्या पैशावर चैनचंगळ करीत रोमान्स उडवायलाच कॉलेजांत जाणारीं बेजबाबदार, स्वच्छंदी फुलपांखरं तुम्ही !

**विद्याधर :** पैशाची किंमत मला कळते. तुमची एक पैसुद्धां मी आजवर अनाठायीं खर्च केलेली नाहीं.

**रावसाहेब :** बस्स. चालता हो दृष्टीसमोरून. उद्दाम ! उर्मट ! तोंडाला तोंड देतोय् आणखी. पुढल्या टर्मला पास हो अन् मगच मला तोंड दाखव. भीक मागून पोट भर. त्याखेरीज अद्दल घडणार नाहीं. खबरदार पुन्हां घरांत पाऊल टाकशील तर ! बडे बापका बेटा !

[ विद्याधर मुकाट्यानें निघून जातो. धांवत धांवत विजया पुढें येते.

**विजया :** भाऊ, थांब, थांब. ( रावसाहेबांकडे वळून ) बाबा, कित्ती कित्ती निष्ठुर, राक्षस आहांत हो तुम्ही ! परक्याच्या घरांत येऊन भाऊला ताडताड बोललांत !

**रावसाहेब :** तुला फुटला वाटतं बंधुप्रेमाचा पान्हा ?

**विजया :** प्रसंग काय नि तुमचं वागणं काय ! घटकेपूर्वीच हुषार स्कॉलर म्हणून भाऊचं तुम्ही कौतुक करीत होतां. अन् आतां तो दुर्दैवानं नापास

होतांच त्याचा असा तिरस्कार करूं लागलांत ? त्याला असं घराबाहेर हांकलून द्यायला तयार झालांत ? तुम्हाला कांहीं काळीज ?

**रावसाहेब :** माझ्या आंतड्याचा पीळ तुला कुठून कळणार ?

**विजया :** बापाचं प्रेम स्वार्थी, डोळस असतं हेंच खरं. आईच्या आंधळ्या, निरपेक्ष मायेची सर त्याला कशी येणार ? आज आई असती तर...तर तिनं असं भाऊला खचित दूर लोटलं नसतं. उलट, पोटाशीं कुरवाळून गोड, प्रेमळ शब्दांनीं त्याला धीरच दिला असता...

[ विजया हुंदका आंवरते आणि डोळे पुसून रावसाहेबांकडे रागानें पहात विद्याधराचे मागोमाग लगबगीनें निघून जाते.

**बाबूराव :** बाकी, रावसाहेब, तुम्ही इतकं नको होतं बोलायला विद्याधराला. फार बोललांत उगीच...

[ नारोपंत येतात.

**नारोपंत :** काय रे रावसाहेब, काय बोललास विद्याधरला ?

**रावसाहेब :** चांगला खरपूस झाडला...खेटरपूजा बांधली...

**नारोपंत :** शहाणपणा केलास ! शिकलेले शहाणेच तुम्ही ! अरे, आज इतकीं वरसं हा बाबू नापास होतोय् पण कधीं एका शब्दानं मी त्याला कांहीं बोललों नाहीं कीं त्याच्यावर अशी आग पांखडली नाहीं...

**रावसाहेब :** पण माझी शिस्त करडी आहे. भलत्या बाबतींत लाड काय कामाचे ? शिस्त म्हणजे शिस्त !

**नारोपंत :** शिस्तीच्या गप्पा पुरे कर. हापीसांतल्या तुझ्या हाताखालच्या कारकूनांना, चपराशांना शिकीव शिस्त. म्हणे शिस्त ! अरे, बाप आहेस कीं आहेस कोण ? तुझ्यासारखे आततायी पालक असा गाढवपणा करतात म्हणून तर नापास झालेलीं पोरं भराभर आत्महत्त्या करायला तयार होतात. समजलास ? विद्याधराला हांकलून दिलास घराबाहेर...त्यानं आतां समुद्रांत उडी घेतली किंवा रेल्वेच्या रूळावर मान ठेवली तर...एकुलता एक मुलगा ! अरे बाबू, जा. जा. बघ. विद्याधर घरींच गेलाय् कीं आणखी कुठं...

**रावसाहेब :** घरींच गेलेला असणार तो. दुसरीकडं कुठं जातोय् ?

**नारोपंत :** अरे पण रावसाहेब, मुलांच्या बाबतींत फाजील लाडाप्रमाणंच

फाजील धाकदपटशहासुद्धां परिणामीं घातकच ठरतो. त्याला इतकं बोललास पण तूं स्वतां काय दिवे लावलेस त्याच्या वयांत अभ्यासाचे ?

**रावसाहेब :** आम्ही काय असे बापकमाईवर चरत चटोर चैनी केल्या कीं कधीं नापास झालों ? आम्हीं...

**नारोपंत :** वा रे तुम्ही ! माझ्याजवळ, या तुझ्या लंगोटीदोस्ताजवळ या थापा मारतोस ? तुझं सारं चरित्र मला तोंडपाठ आहे. मॅट्रिकला चारदां टल्ले खाल्लेस ! बी. ए. व्हावयाला सहा वरसं लागलीं तुला. मला गप्पा सांगतोस ? पोराटोरांना सांग या बाता. म्हणे आम्ही यँव् केलं नि त्यँव् केलं ! वशिल्याच्या जोरावर पैसे पेरून तर रावसाहेब झालास. त्या वाईटमन् साहेबानं हाताशीं धरलं म्हणून...नाहींतर साठ रुपड्यांवर जन्मभर खर्डेघाशी करीत बसला असतास. थोर तोंडानं कर्तबगारीचे पोवाडे गातोय् माझ्यासमोर ! चल. जा घरीं. आधीं पोराची समजूत काढ. सोन्यासारखा सद्‌गुणी, बुद्धिमान्, मुलगा...

**रावसाहेब :** तुला त्याचा एवढा कळवळा येतोय् तर तूंच काढ त्याची समजूत. मी त्या कार्ट्याचं तोंडसुद्धां पाहणार नाहीं. गेलाच असेल घरीं तर आत्तां हांकलतों घराबाहेर...

**नारोपंत :** त्याची इच्छा नसतांना त्याला कॉलेजशिक्षणाच्या चरकांत लोटालंस. स्वतांची प्रतिष्ठा वाढावी म्हणून...

**रावसाहेब :** पैशाचं पाणी करतोंय्. उगीच नाहीं.

**नारोपंत :** अरे, पण सांगितलं होतं कुणी तुला ?

**रावसाहेब :** बस्स-बस्स ! ज्याचं जळतं त्याला कळतं. तुला काय ? तुझा चिरंजीव पास झाला. आतां जगाला अक्कल शिकवायला तुम्ही बापलेक मोकळेच !

[ रावसाहेब तावातावानें निघून जातात.

**नारोपंत :** मनुष्यस्वभावाचा काय नमुना आहे पहा ! बाबू, जा. विद्याधराला बोलावून आण. असाच जा लवकर—

**बाबूराव :** मला वेळ नाहीं दुसऱ्याच्या चांभारचौकशा करायला. मला आतां माझा पुढचा विचार केला पाहिजे...मी आज बी. ए. झालों—

**नारोपंत :** कळलं. पुढं ?

**बाबूराव :** आतां मी एम्. ए. च्या नि लॉच्या टर्म्स एकदमच भरणार !

**नारोपंत :** अन् एमे एलेल्बी होऊन काय करणार ? मास्तरकी करीत पोरं हांकणार कीं वकिलीची पाटी लावून अशीलांची वाट बघत बसणार ? बाबू, मी तुला आतां स्पष्टच सांगतों. तूं ग्रॅज्यूएट् झालास. मला आनंद झाला. तुझी हौस तूं पूर्ण केलीस. आतां उद्यांपासून कारखान्यांत कामाला चल.

**बाबूराव :** अन् काय करूं ? तुमच्या गिरणीच्या यंत्रांपैकींच एक यंत्र बनूं ?

**नारोपंत :** मग आणखी शिकून सुशिक्षित बेकारांच्या यादींत भर घाल. बी. ए. ला बारा वरसं लागलीं, आतां एमे एलेल्बीला पुन्हां एक तप !

**बाबूराव :** माझ्या उच्च शिक्षणाचं महत्त्व तुम्हाला कसं कळणार ?

**नारोपंत :** खरं आहे. मी आपला अडाणी, इंग्रजीचा गंधहि नसलेला, लुगड्यांच्या कारखान्याचा मालक ! पदवीधर कुठं आहें मी ?

**बाबूराव :** तें कांहीं नाहीं. निदान एम्. ए. तरी झालंच पाहिजे मला.

[ दया येते.

**दया :** एम्. ए. होतांच तुला काय कुणी हिंदुस्थानचा व्हाइसरॉय नेमणार आहे वाटतं ?

**बाबूराव :** चेष्टा वाटते तुला ? ग्रॅज्यूएट् आहें मी—

**दया :** दरसाल असे शेंकडों ग्रॅज्यूएट् युनिव्हर्सिटीच्या गिरणींतून बाहेर पडून बेकार भटकताहेत !

**बाबूराव :** ते असतील अजागळ, व्यवहारशून्य !

**नारोपंत :** अन् तूं बडा विद्वान् ! व्यवहारपंडित !

**बाबूराव :** बस्स ! बाबा, मला एकच अखेरचं सांगा. पुढच्या शिक्षणासाठीं...

**नारोपंत :** मी तुला दिडकीसुद्धां देणार नाहीं.

**बाबूराव :** ठीक आहे. मलाहि जरूर नाहीं तुमच्या मदतीची. स्वतांच्या पायावर उभा राहायला माझा मी समर्थ आहें.

**नारोपंत :** तुझ्यासारखा आळशी आयतोबा स्वावलंबी बनणार ?

**बाबूराव :** पहालच आतां. प्रथम पोटापुरती नोकरी पाहतों...

**दया :** वाटेवरच पडल्यात कीं नाहीं नोकऱ्या !

**बाबूराव :** ग्रॅज्यूएट् आहें कसा झालों तरी. एक सोडून छप्पन्न नोकऱ्या चालून येतील माझ्या पायाशीं !

**दया :** ( हंसून ) न दिसे एकहि सर्व्हिस् डिग्रीनेंही असाध्य आहे जी ! असंच ना ?

**नारोपंत :** पण ते दिवस गेले. आजकाल सर्व्हिसचा सिंहगड सर करायला डिग्रीच्या तरवारीपेक्षां वशिलेबाजीची घोरपडच जास्त उपयोगी पडते.

**बाबूराव :** बिशाद काय नोकरी मिळत नाहीं ! नोकरी संभाळून, अभ्यास करून आपलं ध्येय गांठणारे पुष्कळ आहेत.

**नारोपंत :** कबूल आहे. पण ती कुवत तुझ्यांत नाहीं. ऐषारामाला चटावलेला, सुखाला लालचावलेला तूं...

**बाबूराव :** बराय् ! दाखवितोंच माझा पराक्रम ! हा ठोकला घराला रामराम !

[ बाबूराव एकदम त्वेषानें निघून जातो.

**दया :** दादा, दादा, हा काय वेडेपणा !

**नारोपंत :** जाऊंदे ग त्याला. पदवीची बोथट तरवार घेऊन तुझा दादा जग जिंकायला जातोय् ! जाऊंदे. परिस्थितीच्या लाथा खाऊन आपोआप घरीं परत येईल चार दिवसांनीं.

## [ २ ]

मरीन ड्राईव्ह. रावसाहेब समुद्राची हवा खात बसले आहेत. बाबूराव सहज फिरत फिरत तेथें येतो.

**बाबूराव :** नमस्ते रावसाहेब !

**रावसाहेब :** कसं काय बाबूराव ? हवा खायला आलास वाटतं ?

**बाबूराव :** होय. हवाच खाऊन जगणं भाग आहे आतां.

**रावसाहेब :** म्हणजे ?

**बाबूराव :** अहो, अन्न मिळायचे वांधे पडले. म्हटलं, फुकटची हवा तरी पोटभर खावी.

**रावसाहेब :** पंतांनीं सांगितला मला तुझा सारा इतिहास. पण हल्लीं असतोस कुठं ?

**बाबूराव :** कुठंतरी असतों झालं. दिवसभर भटकतों. रात्रीं एखाद्या मित्राच्या बिऱ्हाडीं आसऱ्याला जातो. एकेक दिवस ढकलतोंय्.

**रावसाहेब :** पण कांहीं नोकरीधंदा ?

**बाबूराव :** धंदा बेकारीचा !

**रावसाहेब :** म्हणजे ? अजून कुठंच सर्व्हिस् मिळाली नाहीं तुला ? तूं एवढा ग्रॅज्यूएट्...

**बाबूराव :** अहो पण विचारतोय् कोण ? गल्लोगल्लीं पडलेत माझ्यासारखे शेंकडों ग्रॅज्यूएटस् ! रावसाहेब, भ्रमाचा भोपळा पार फुटला. अब्रूचं खोबरं झालं. एक वेळची खाणावळ भागण्यापुरतीहि कुठंच नोकरी मिळत नाहीं.

**रावसाहेब :** रेलवे, पोस्ट, बँका, कस्टम...

**बाबूराव :** सारीं खातीं उलथीं पालथीं केलीं. अख्खी मुंबई पायाखालीं तुडविली. सरकारी, निमसरकारी, खासगी, सगळ्या संस्थांना भेट दिली. देशी विदेशी फर्म्स धुंडाळल्या पण चहुंकडे एकच महामंत्र ! नो व्हेकन्सी ! छापखाने –विमाकंपन्या–गिरण्या–सिनेमाकंपन्या ! सगळ्या ठिकाणीं खडा टाकून पाहिला. पण नशीबानं सर्वत्र नकारघंटा वाजवून खडे चारले. अहो, आंतपर्यंत प्रवेशच मिळत नाहीं. मॅनेजर राहतो आंत ऑफिसांत. दारावरचा पठाणच लावतो वाटेला. कसं करणार ? आतां फक्त एका ठिकाणीं व्हेकन्सी पहायची राहिलीय्.

**रावसाहेब :** कुठं ?

**बाबूराव :** स्वर्गांत ! स्वर्गांत नसली तर नरकांत तरी खास जागा मिळेल.

**रावसाहेब :** बरं पण आत्तांपर्यंत कधीं तुला नोकरीचा अनुभव ?

**बाबूराव :** तो कुठला ? आम्हीच काय, आमच्या बापानंहि कधीं कुठं नोकरी केली नाहीं आजवर. ठाऊकच आहे तुम्हाला.

**रावसाहेब :** शॉर्टहँड टायपिंग ?

**बाबूराव :** कोण लेकाचा शिकलाय् ? जरूरच काय !

**रावसाहेब :** कॉरस्पॉन्डन्स...अकाऊंटन्सी...बुक्कीपींग...

**बाबूराव :** अहो, बी. ए. ला हे विषय नसतात.

**रावसाहेब :** मग तुझ्यासारख्या बावळ्याला कोण रे नोकरी देणार ? अरे,

पण या सुरळ्या कसल्या हातांत ?

**बाबूराव :** माझ्या कर्माच्या ! हें बी. ए. चं सर्टिफिकेट ! हीं शिफारस-पत्रं अन् हा नोकरीच्या अर्जाचा नमुना !

**रावसाहेब :** भले ! अन् बगलेंत हे गठ्ठे कसले ?

**बाबूराव :** ताजीं वर्तमानपत्रं आहेत हीं. इंग्रजी, मराठी, गुजराथी...

**रावसाहेब :** म्हणजे आतां पेपरविक्याचा धंदा पत्करलास वाटतं ?

**बाबूराव :** छे हो ! वाँटेडच्या जाहिराती पाहण्यासाठीं गोळा केलेत हे पेपर. जाहिरात पाहायची कीं लगेच अर्ज खरडायचा. उलट उत्तरासाठीं सोबत तिकीटांचा आहेर पाठवायचा. पण अखेर काय ? निराशा ! स्नेह्यासोबत्यांकडून उसने काढून आत्तांपर्यंत ३१ रु. १२ आणे खर्च केले टपालासाठीं !

**रावसाहेब :** इतक्यांपैकीं एकाहि अर्जाचं उत्तर आलं नाहीं ?

**बाबूराव :** उत्तरं आलीं. चार दोन ठिकाणीं समक्ष भेटीलाहि बोलावलं.

**रावसाहेब :** बरं मग ?

**बाबूराव :** मग काय ? वाटाण्याच्याच अक्षता !

**रावसाहेब :** एखाद्या शिक्षणसंस्थेंत प्रयत्न केलास ?

**बाबूराव :** पहिली उडी तिथंच टाकली. पण सपशेल तोंडघशी पडलों. एका शाळेंत एक जॉब होता. पण त्यांना हवा होता सायन्स नि गणीत शिकवणारा. आणि आम्ही घेतलेला भाषाविषय. गणीताशीं नि सायन्सशीं आमचा उभा दावा ! नुसते शेले शेक्सपिअर उरावर नाचविलेले आम्ही ! कालच एका फर्ममध्यें इंटरव्ह्यूला गेलों होतों. पण मला जायला दोनच मिनिटें उशीर झाला. मॅनेजरनं सांगितलं, जागा भरली ! नशीब कसं रेसच्या घोड्याप्रमाणं माझ्यापुढं धांवतंय् ! अन् या मद्राश्यांनीं तर कहरच केलाय् ! जॉब दिसला कीं मद्रासी घुसलाच ! गूळ तिथं माशी अन् व्हेकन्सी तिथं मद्राशी !

**रावसाहेब :** आपल्या अंगीं वकूब नाहीं. उगीच दुसऱ्यांना दोष देण्यांत काय अर्थ आहे !

**बाबूराव :** रावसाहेब, तुमच्या वशील्यानं एखादा जॉब मिळवून द्या ना मला. तुम्ही मनावर घेतलंत तर—तुमच्याच ऑफिसांत...

**रावसाहेब :** अरे बाबू, नोकऱ्या झाडाला का लागल्यात ? त्यांतून सरकारी नोकरी...हरे राम ! रिट्रेंचमेंटचा वरवंटा कसा चहुंकडं फिरतोय्, तुला ठाऊक नाहीं. हो. नाहीं म्हणायला एक जागा आहे आमच्या ऑफिसांत...

**बाबूराव :** ( आर्जवी स्वरांत ) मग माझ्यासाठीं तेवढी खटपट करा ना—

**रावसाहेब :** जागा आहे दरमहा पस्तीसची...

**बाबूराव :** फार झाले पस्तीस रुपये.

**रावसाहेब :** अरे, पण त्या एका जागेसाठीं चारशें बावन्न अर्जांचीं भेंडोळीं आलीं आहेत. सर्टिफिकिटं नि वशिले...हज्जार !

**बाबूराव :** मग रावसाहेब, मेहेरबानी करून माझ्यासाठीं तुम्हीच...

**रावसाहेब :** शब्द टाकूं कसा ? तुझ्यापेक्षां मोठमोठ्या क्वालीफिकेशनचे अर्जदार आहेत. कुणी बी. ए. ऑनर्स !

**बाबूराव :** आय सी !

**रावसाहेब :** कुणी डबल् ग्रॅज्यूएट् !

**बाबूराव :** माय गॉड !

**रावसाहेब :** कुणी फर्स्टक्लास M. A., M. SC., LL. B. !

**बाबूराव :** मेलों ! ठार झालों. ( मटकन् खालीं बसतो. )

**रावसाहेब :** असे जाडे विद्वान, बडे पदवीधर त्या पस्तीस रुपड्यांच्या जागेसाठीं प्राण टाकताहेत ! पण काय ! कालच साहेब म्हणाला कीं ती जागा हेडक्लार्कच्या मेहुण्याला द्यायची म्हणून !

**बाबूराव :** तें कां ?

**रावसाहेब :** वशिला ! अन् तो हेडक्लार्कचा मेहुणा आहे नॉन् मॅट्रिक !

**बाबूराव :** पण रावसाहेब, हिमालयाएवढे उपकार होतील माझ्यावर... कांहीं करा पण नोकरी द्या !

**रावसाहेब :** अरे बाबा ! ही बेकारी बरं बेकारी ! आपल्या हिंदुस्थानांतच नव्हे तर साऱ्या दुनियेंत, मोठमोठ्या सुधारलेल्या स्वतंत्र देशांतहि बेकारीचं भूत थैमान घालतंय् ! ही बेकारी नष्ट करण्याचा रामबाण उपाय एकच...

**बाबूराव :** (मध्येंच) हें पहा रावसाहेब, बेकारीवरचं व्याख्यान नका ऐकवूं मला. उपदेशांचे डोस पाजविणारे हितचिंतक रोज पावलोंपावलीं भेटताहेत मला. उपदेशापेक्षां नोकरीचीच गरज सध्यां जास्त आहे मला.

**रावसाहेब :** पुन्हां तुझी कथा मूळपदावर ! अरे, नोकरी काय माझ्या कडोसरीला आहे ? बापाचा मोठा चांगला कारखाना आहे. शेंकडों माणसं बाप पोसतोय् अन् तूं असा गाढवासारखा दुसऱ्यापुढं तोंड वेंगाडत उगीच वणवणतो आहेस ! जा परत नाक घांशीत बापाकडं ! ' तुझें आहे तुजपाशीं ! परी जागा चुकलाशी ! '...

**बाबूराव :** खरंच मी जागा चुकलों. फुकट तुम्हाला शब्द टाकला.

**रावसाहेब :** तुम्ही आजकालचीं पोरं ! सगळीं अशींच. तो आमचा दीड-शहाणा विद्याधर...

**बाबूराव :** त्याचा कांहीं पत्ता ?

**रावसाहेब :** हिंडतोय तुझ्यासारखाच नोकरी धुंडाळीत.

**बाबूराव :** तुम्ही त्याची पूसतपास केली नाहीं ?

**रावसाहेब :** वांद्र्याला आहे म्हणे कुठं स्नेह्यासोबत्यांकडे....

**बाबूराव :** घरीं येत नाहीं ?

**रावसाहेब :** तूं जातोयस् का आपल्या घरीं ? तुम्ही आजकालचीं पोरं ! शिकलेले शहाणे ! अंगीं अक्कल नाहीं काडीची पण घमेंड मात्र भरपूर. मरा म्हणावं लेको उपाशी ! पोटाला चिमटा बसला कीं आपोआप ताळ्यावर येईल डोकं ! ( उठून ) अच्छा ! जातों रे बाबा...( स्वतांशीं पुटपुटत ) विजू आलेली दिसत नाहीं...

**बाबूराव :** रोज येतां वाटतं इकडे फिरायला ?

**रावसाहेब :** होय. मी ऑफीसांतून परस्पर येतों...विजू थेट घरून येते अन् मग जातों आम्ही परत मिळूनच...

**बाबूराव :** निघालांतच तुम्ही ? पण रावसाहेब, मी आज भायखळ्याहून पायीं रखडत आलों कोटांत...दिडकी नाहीं खिशांत...एखादा रुपया द्या बरं असला तर...

**रावसाहेब :** रुपया ! रुपयाचे आणे सोळा होतात. ठाऊक आहे ना ? हे दोन आणे घे...

[ दोन आणे बाबूरावाच्या हातावर टाकून हंसत हंसत रावसाहेब जातात. बाबूरावहि दुसरीकडे निघून जातो. विजया व दया येतात.

**विजया :** आज बाबा आलेले दिसत नाहींत.

**दया :** कशावरून ?

**विजया :** ही त्यांची ठराविक जागा आहे बसायची. पण दये, तूं इकडे कुणीकडे ?

**दया :** बाबांच्या बरोबर आलें सहज फिरायला.

**विजया :** मग पंत कुठे आहेत ?

**दया :** ते तिकडे क्रिकेटक्लबमध्यें बसलेत. म्हटलं, आपण जरा हवा खावी.

**विजया :** अस्सं होय ? तरी म्हटलं, हें माटुंगम् इकडे कुठं उगवलं ?

**दया :** हो पण विजू, विद्याधरांचा कांहीं पत्ता ? अजून ते घरीं आले नाहींत ?

**विजया :** छे ग ! तुझ्याच बंधुराजांचा नमुना !

**दया :** आमचा दादा काय, विक्षिप्तच ! भेटतो मला मधून मधून...नोकरीसाठीं वणवणतोय्. आपण होऊन अंगावर आपत्ति ओढवून घेतलीय् त्यानं ...पण विद्याधर समंजस आहेत...

**विजया :** तरी पण हट्टी नि एककल्लीच. भाऊ गेल्यापासून घर कसं खायला उठलंय् ! बाबूराव तुला भेटतात तरी. पण भाऊचं दर्शन नाहीं.

**दया :** रावसाहेब चौकशी नाहीं करीत त्यांची ?

**विजया :** आमचे बाबा म्हणजे बाबाच आहेत ! त्यांना स्वतांपलीकडे जग दिसतच नाहीं.

**दया :** एकेकाची तऱ्हाच विलक्षण ! पण जातें बाई आतां. बाबा वाट पहात असतील. अंधार पडला अन् पावसाचाहि रंग दिसतोय्...तूंहि चल.

**विजया :** तूं जा. मी आल्यासारखी बसतें जरा हवा खात...( दया लगबगीनें जाऊं लागते ) अग, पण जरा हळूं, सावकाश चाल.

जरा हळूं जपून चल बाई ग !
करूं नको उगिच अशी घाई ग !

[ दया हंसत हंसत जाते. तोंच दुसऱ्या बाजूनें विद्याधर येतो. विजया त्याला न ओळखतां घाबरून मागें फिरते.

**विद्याधर :** शुकू ! शुकू ! ( विजयेला आडवितो )

**विजया :** कोण रे तूं धटिंगण ? चल हो दूर...

**विद्याधर :** ( जवळ जाऊन ) ताई ! विजूताई ! घाबरूं नकोस. मी विद्याधर...ओळखलं नाहींस मला तूं ?

**विजया :** ( आश्चर्यानें ) कोण ? भाऊ ?

**विद्याधर :** ताई, साऱ्या जगाप्रमाणंच तूंहि मला दूर लाथाडतेस का ? बाबांच्यासारखाच तुलाहि मी परका वाटूं लागलों का ?

**विजया :** नाहीं रे भाऊ ! असं होईल तरी कसं ? मी तुला दुरून ओळखलंच नाहीं...काय हा तुझा भेसूर अवतार ! दाढी बोटभर वाढलेली, कपडे मळके, चेहरा वाळलेला...हो पण भाऊ, तूं होतास तरी कुठं इतके दिवस ? सगळ्या ओळखीच्या ठिकाणीं, तुझ्या मित्रांकडे मी तुझा तपास केला...वांद्र्याला होतास असं कळलं...

**विद्याधर :** सुरवातीला होतों एकदोन दिवस तिथं एका स्नेह्याकडे. पण कशाचे स्नेही नि काय ? प्रसंगीं कोण कुणाचा नव्हे. दाट ओळखीचे लोकहि तोंडओळखसुद्धां न देतां तोंड चुकवूं लागल्याचा कडू अनुभव येतोय् !

**विजया :** व्यवहारी जगाचीच तुला तोंडओळख होतेय् असं समज.

**विद्याधर :** खरं आहे. चिमुकल्या घरट्यांतून उडून अवाढव्य जगाच्या पसाऱ्यांत पहिल्यांदाच झेंप घेणाऱ्या पिलाप्रमाणंच भांबावून गेलोंय् मी !

**विजया :** ( कळवळून ) पण भाऊ, काय रे ही तुझी केविलवाणी दशा ! तूं आजारी तर नाहींस ?

**विद्याधर :** अलीकडे रोज बारीक ताप येतोय् मला. त्यांतून खरं सांगायचं म्हणजे गेले दोन दिवस मी अगदीं उपाशी आहें.

**विजया :** काय ? तुझ्या पोटांत दोन दिवस अन्न नाहीं ? ( गहिंवरून ) भाऊ, चल, असाच आधीं घरीं चल...मी माझ्या हातांनीं स्वयंपाक करून तुला पोटभर जेवूं घालतें. चल घरीं.

**विद्याधर :** मला बाबांची भीति वाटते.

**विजया :** बाबा काय खातात कीं गिळतात ? मी आहे ना ? चल तूं...

**विद्याधर :** नको. ताई ! समुद्रांत उडी टाकून मोकळं व्हावंसं वाटतंय्... रोज त्याच निश्चयानं मी इथं येतों पण अजून धीर होत नाहीं. मी कां नि कसा जगतोंय् हेंच माझं मला कळत नाहीं. मात्र कधीं ना कधीं या समुद्राचाच आसरा...

**विजया :** ( घाबरून ) भाऊ ! भाऊ ! काय बोलतोस हें ? तुला माझ्या गळ्याची शप्पथ आहे. आधीं घरीं चल पाहूं...

**विद्याधर :** ( निश्चयी स्वरानें ) प्राण गेला तरी अशा परिस्थितींत मी मुळींच घरीं येणार नाहीं.

**विजया :** यायचंच नसेल तुला घरीं, तर निदान असं तरी कर...

[ विजया आपल्या बोटांतली हिऱ्याची अंगठी काढून विद्याधराचे हातीं देते.

**विद्याधर :** हें काय ?

**विजया :** तूंच एकदां मागें भाऊबीजेला घातलेली ही हिऱ्याची अंगठी ! ही घेऊन बाजारांत वीक...कांहीं दिवस तरी पोटाची गुजराण होईल.

**विद्याधर :** छेः छेः ! ताई, ही हिरकणी नको माझ्याजवळ. प्रसंगीं ही हिरकणीच चावून प्राण सोडण्याचा मोह मला अनावर होईल. ( अंगठी परत देतो. )

**विजया :** मग या सोन्याच्या बांगड्या तरी घे—

[ विजया बांगड्या काढून विद्याधराच्या हातांत देऊं लागते. त्या तो घेत नाहीं.

**विजया :** घे ना ? भाऊ, गप्प कां ? भाऊ, बोल ना ?

**विद्याधर :** बोलूं ? काय बोलूं ? विजूताई, तुझ्या बंधुप्रेमानं यावेळीं मला मुकं केलं आहे ग ! जगांत कुणासाठींच, स्वतांसाठींसुद्धां जगावंसं वाटत नाहीं. पण या माझ्या प्रेमळ विजूताईसाठीं मात्र...

[ तोंड फिरवून अश्रु पुसतो. इतक्यांत मोटारचा हॉर्न वाजतो. लगेच ब्रेकचा कर्कश आवाज ऐकूं येतो.

**विद्याधर :** अरे बाप रे ! अपघात झाला वाटतं ?

[ विजया व विद्याधर जातात. दुसऱ्या बाजूनं नारोपंत येतात.

**नारोपंत :** आठ वाजायला आले. अजून कुठं फिरते आहे ही ! तो कार्टा तसा बेफाम निघाला. ही पोरटी अशी...

[ इतक्यांत दयेला घेऊन विजया व विद्याधर येतात.

कोण ? माझी दया ?... अॅक्सीडंट् ?...

**विजया :** घाबरूं नका पंत ! अपघात झाला नाहीं. व्हायचा टळला.

**दया :** धांवत येऊन यांनीं मला एकदम मागें खेचलं नसतं तर मग मात्र...

**नारोपंत :** पण कुठं हिंडत होतीस इतका वेळ ?

**दया :** तुम्हालाच शोधीत होतें मी. क्लबमध्यें जाऊन आलें.

**नारोपंत :** छाऽऽन ! अन् मी तुला इकडे शोधतोंय् ! बरं तर बरं. जीवावरचा प्रसंग...( विद्याधरास ) तुम्ही होतां म्हणून निभावलं. फार उपकार झाले बुवा तुमचे ! ( जवळ जाऊन निरखून पाहून ) अरे, पण कोण ? विद्याधर तूं ! अरे, पण ! काय रे हें ? ओळखूंसुद्धां येईनास...तूं कुठं इकडे ?

**विजया :** समुद्रांत उडी घ्यायला भाऊ निघाला आहे....

**दया :** ( घाबरून ) अग्ग्या ! खरंच ?

**नारोपंत :** काय म्हणतेस ? विद्याधर, पुरुषासारखा पुरुष...मर्द नवजवान तूं ! अन् परीक्षेंत नापास झालास म्हणून भागूबाईप्रमाणं जीव देतोस ?

**विद्याधर :** पंत, पदवीसाठीं मी प्राण टाकीत नाहीं; पण हाडाचीं काडं, रक्ताचं पाणी करून बी. ए. पर्यंत शिकलों अन् पोटापुरतंहि मिळवायची मला अक्कल नाहीं, म्हणून माझी मलाच लाज वाटते जगांत जिवंत राहायची. चार आठ आण्यांच्या रोजमुऱ्यावर राबावं म्हटलं तर तशीहि संधि मिळत नाहीं. परिस्थितीचा गुलाम झालोंय् मी !

**नारोपंत :** परिस्थितीचा नव्हे तर स्वतांच्या मनाचाच तूं गुलाम झाला आहेस. अरे, इच्छा आहे तिथं मार्ग आहे. संधि नाहीं म्हणून रडत बसण्यांत काय पुरुषार्थ आहे ?

**विद्याधर :** बेगडी प्रतिष्ठा, सुशिक्षितपणाचा खोटा दिमाख मात्र अंगीं शिरलाय्. वयाचीं इतकीं वरसं त्या कॉलेजांत पदवीपायीं पोपटपंची करण्यांत वायां दवडलीं. त्यापेक्षां या जगाच्या शाळेंतच व्यवहाराचे धडे—

**नारोपंत :** शिक्षणाला दूषण देणं मूर्खपणाचं आहे. नामांकित पदवीधर होऊन गेले. टिळक, रानडे, आगरकर...दैदीप्यमान् तारे ! मावळले तरी अजून आपल्या उज्ज्वल चारित्र्यानं जगाचा मार्ग उजळताहेत ! ज्यांनीं कॉलेजची पायरी ओलांडली नाहीं अशींहि विद्वान् कर्तबगार नररत्नं लाखांनीं आहेत. पदवींत काय आहे ? केवळ पदव्या म्हणजे विद्वत्तेचं, शहाणपणाचं मोजमाप नव्हे. पदवी असो वा नसो, उच्च शिक्षण लाभो वा न लाभो, हिरा तो हिराच ! झळकलाच पाहिजे. पण ही अलीकडली सुखलोलुप, ऐदी, कमकुवत शरीराची, निस्सत्व मनाची, ध्येयशून्य पोशाखी दुबळी तरुण पिढी !...पण जाऊं दे. हा काथ्याकूट करण्याचं हें स्थळ नव्हे. हा प्रसंग नव्हे. मी सांगेन तसं वागायची तयारी आहे तुझ्या मनाची ?

**विद्याधर :** मी तुमच्या आज्ञेबाहेर नाहीं.

**नारोपंत :** ठीक आहे. चल तर माझ्याबरोबर घरीं. उद्यांपासून माझ्या कारखान्यांत काम करायला लाग. सकाळपासून संध्याकाळपर्यंत मजूराप्रमाणं राबावं लागेल. आहे कबूल ?

**विद्याधर :** कबूल आहे. पंत ! उज्ज्वल भविष्याचा सन्मार्ग दाखविणारे तुम्हीच माझे परमेश्वर !

**नारोपंत :** बाबूच्या ठिकाणीं तुलाच मी माझा मुलगा मानतों.

[ दया आनंदानें ' बघ जीवन–रणसंग्राम ' हें गाणें गुणगुणूं लागते.

**विजया :** वा ! दये ! मघांशीं मोटारीखालीं चेंगरत होतीस. अन् इतक्यांत गाणं सुचलं का तुला ?

**दया :** ( हंसून ) अग, दोन्ही अपघात टळले !

**विद्याधर :** दोन कोणते ?

**दया :** एक माझा नि दुसरा तुमचा !

[ विद्याधर मोठ्यांदा हंसतो.

**नारोपंत :** म्हणून तूं गायला लागलीस आनंदानं ?

**दया :** विद्याधरांनींच रचलेलं उत्साह-गीत त्यांचं त्यांनाच ऐकवायला...

**विजया :** हाच प्रसंग योग्य आहे.

**नारोपंत :** अग, मग मोठ्यांदा तरी म्हण. मलाहि ऐकूंदे कीं...

**दया :** अं हं ! आतां घरीं गेल्यावर...

[ इतक्यांत एका इमारतींतील रेडिओमधून पुढील बोल कानीं येतात.

उसळे जीवन-सागर घोर !
प्रलयकाळ जरी निकटीं धांवे
चिंतातुर कां अंतर व्हावें ?
संकटीं ज्याचें धैर्य दुणावें
तो पुरुषोत्तम थोर !

**नारोपंत :** विद्याधर ! ऐक !

[ सर्व चालूं लागतात.

[ ३ ]

फूटपाथवर एका भिकार हॉटेलसमोर पान चघळीत, सिगारेट फुंकीत रस्त्यावरील रहदारीकडे शून्य नजरेनें पहात बाबूराव विमनस्कपणें उभा आहे. हॉटेलमधील गिऱ्हाईकांचा गलबला, गोंगाट, कपबशांचा खडखडाट, 'तीन इसम सव्वादोन आणे...एक इसम पावणेचार आणे...' असें किंचाळणाऱ्या पोऱ्यांचा दणदणाट कानावर आदळत असतो. मधूनमधून कुजबूज, हंशा वगैरे. एक भिकाऱ्याची पोरगी पलीकडेच खड्या सुरांत गाणें म्हणत असते.

रमला कुठें ग कान्हा ? कां अजुनी येईना ?

बाई ! तिन्हीसांजा झाल्या
गाई घरा परतल्या
धुंडोनि नजरा शिणल्या
कुठें शोधूं माझा तान्हा ?

मुरलीचा मंजुळ सूर
घुमतो का कोठें दूर ?
लागे जिवा हुरहूर
आवरेना फुटला पान्हा !

[ गाणें म्हणत म्हणत ती मुलगी बाबूरावापुढें येऊन उभी राहते व हात पसरते.

**बाबूराव :** चल हट् ! ( स्वतांशीं पुटपुटतो ) आम्हाला इकडे जगायचं कसं, ही जिकीर ! अन् हिला पडलीय् कान्ह्याची फिकीर !

**मुलगी :** रावसाहेऽऽब ! एक दिडकी द्या गरीबाला...

**बाबूराव :** मलाच दे तुझ्याजवळची दिडकी. म्हणजे पुन्हां ढोंसतो एक सिंगल. काय कटकट आहे शिंची ! सळो की पळो करून सोडलंय् या भिकाऱ्यांनीं ! मिनीटभर कुठं रस्त्यावर उभं राहायची सोय नाहीं. जमलीच यांची भुतावळ भोंवतीं !

[ बाबूराव वैतागून तेथून जाऊं लागतो. तोंच हॉटेलांतल्या रेडिओ-मधून पुढील गाणें ऐकूं येतें.

रमला बघ कुंजवनांत तुझा कान्हा येईना !
गिरिधारी बन्सीवाला ! करी जादुगारी लीला
कसा मोही मनाला ! धुंद झाल्या गोपबाला
छंद लावी नंदलाला जगाला
यदुनंदन दे नव नंदनवनशोभा मधुवना !

**बाबूराव :** अग, एऽऽपोरी ! लागला शोध तुझ्या कान्ह्याचा ! तो बघ तिकडे कुंजवनांत रमलाय् ! जा तिकडे...चले जाव यहांसे !

[ बाबूराव त्या मुलीला हांकलून लावतो. इतक्यांत रस्त्यावरून चाल-लेल्या विद्याधराकडे त्याचें सहज लक्ष जातें. तो त्याला हांक मारतो.

**बाबूराव :** एऽऽसहस्रबुद्धे ! एऽऽहजारबुद्धे ! विद्याधर !

[ विद्याधर येतो.

**विद्याधर :** कसं काय बाबूराव ? बरेच दिवसांनीं मुलाखत झाली ?

**बाबूराव :** चल दोस्त, चहा घेऊं...

**विद्याधर :** कुठं ? या भिकार हॉटेलांत ?

**बाबूराव :** अरे बाबा, ही बेकारी बरं ! बेकारी ! तीं इराण्याचीं हॉटेलं, तीं ऑम्लेटं, तें पुडिंग, त्या केक्स ! विसरा आतां सारं. दिडकीचा सिंगल नि दोन दिडक्यांचीं भजीं खाऊन वेळ भागवावी लागतेय् महाराजा ! आहेस कुठं ? चल, त्या नाक्यावरच्या इराण्याकडे जाऊं...

**विद्याधर :** माफ कर. चहा सोडलाय् मी...

**बाबूराव :** खरंच ? मग कॉफी, दूध, सोडा–लेमन...

**विद्याधर :** थँक्स् ! कांहीं नको.

**बाबूराव :** राहिलं. ए पोऱ्या ! एक सुका कात मसाला नि दोन पिवळा हत्ती ! ( विद्याधरास ) पान खाऊन वर सिगारेटची धुरी तरी...

**विद्याधर :** नको रे ! सिगारेट, पानपट्टी...सारं कांहीं सोडलंय् मी...

**बाबूराव :** वंडर ! तूं उद्यां प्राणसुद्धां सोडशील...

**विद्याधर :** तोच प्रसंग आला म्हणून तर हीं चैनीचीं चटोर व्यसनं सोडलीं. बरं पण, तुझी हालहवाल ?

**बाबूराव :** हाल भरपूर ! हवाला नशीबावर !

**विद्याधर :** पण तुला कुठंतरी मास्तरचा जॉब मिळाला होता ना ?

**बाबूराव :** मिळाला नि लगेच गेलाहि. मास्तरकी नव्हे. म्हारकी ठरली ती ! हेडमास्तरानं चार दिवस आमची चांचणी घेतली नि पांचव्या दिवशीं ' नालायक ' असा शिक्का मारून कायमची रजा दिली अस्मादिकांना !

**विद्याधर :** मग आतां पुढची लाईन ?

**बाबूराव :** आमच्या नशिबीं आतां एकच लाईन ! रेलवे लाईन !

**विद्याधर :** म्हणजे ?

**बाबूराव :** सरळ जाऊन धांवत्या लोकलपुढं उडी घ्यायची !

**विद्याधर :** तुझ्याजवळ कोरं करकरीत बी. ए. चं सर्टिफिकेट असतांना ?

**बाबूराव :** काय जाळायची आहे ती सर्टिफिकेटची सुरळी ? सिनेमाच्या हॅंडबीलइतकीसुद्धां तिची किंमत नाहीं व्यवहारी जगाच्या बाजारांत ! कुत्रं-सुद्धां तंगडी झुकवीत नाहीं अशा सर्टिफिकेटांवर !

**विद्याधर :** सोयीस्कर नोकरी करून एम्. ए. एल्‌एल्. बी. होणार ना तूं ?

**बाबूराव :** हो. पण आधीं जगण्यापुरती नोकरी तर मिळाली पाहिजे. विद्याधर, नोकरीसाठीं वाट्टेल तें करायला तयार आहें मी. देशांतर, वेषांतर, भाषांतर, जन्मांतरसुद्धां करीन ! साहेबाचे बूट पुशीन...वरिष्ठांपुढं सत्रांदा नाक घांशीन...केलं पाहिजे तें तर करीनच पण करायला नको तेंसुद्धां करीन.

**विद्याधर :** पण कांहीं स्वाभिमान ?

**बाबूराव :** कंठाशीं आलाय् प्राण ! अन् कसला स्वाभिमान ? पोटाची आग भडकली कीं सुटते सारी माणुसकी ! पण काय चमत्कार आहे पहा ! पदवीधर असून मी बेकार अन् पदवी नाहीं म्हणून तूं बेकार !

**विद्याधर :** मी कुठं बेकार आहे ? भरपूर उद्योग मिळालाय् मला.

**बाबूराव :** म्हणजे ? कुठं एखादी लठ्ठ पगाराची नोकरी...

**विद्याधर :** नोकरी ? लाथ मारलीय् मी नोकरीवर ! धंद्यांत शिरलोंय् मी.

**बाबूराव :** ग्रँड ! मी मात्र पदव्यांच्या नादानं अजून...

**विद्याधर :** तुला पाहिजे नोकरी !

**बाबूराव :** नोकरीच पाहिजे असं नाहीं. दरमहा किमान साठसत्तर तरी रुपये पाहिजेत मला खर्चाला. नोकरीला न ठेवतां कुणी इतके पैसे दिले तरी...

**विद्याधर :** वा रे लाडोबा ! कष्ट न करतां आयतं गिळायला हवं तुला ?

**बाबूराव :** अरे, फडतूससुद्धां नोकरी मिळतच नाहीं. मग काय म्हणायचं ! हॉटेलांतल्या पोऱ्याची, वाढप्याची, पट्टेवाल्याची....कसलीच नोकरी मिळत नाहीं. खूप खटपट केली.

**विद्याधर :** प्रयत्न तरी योग्य दिशेनं चाललाय् ना ?

**बाबूराव :** आतां फक्त हातांत प्रभाकर कंदील घेऊन किंवा टाळक्यावर पेट्रोमॅक्स ठेवून या अंधेऱ्या आयुष्यांत नोकरी शोधायचं शिल्लक राहिलंय् ! भाराभर पुस्तकं वाचून पोपटपंची करीत सरस्वतीच्या हमालींत फुकट आयुष्य घालविलं ! त्याऐवजीं प्रत्यक्ष हमाली केली असती तर रोजीं चारदोन रुपये कमावून अब्रूनं स्वतंत्रपणें जगायला मरण नव्हतं.

**विद्याधर :** अरे, कित्येक पदवीधर अक्षरशः हमाली करताहेत !

**बाबूराव :** मीहि उद्यांपासून दंडावर बिल्ला बांधून कूली म्हणून उभा राहतों वोरीबंदरवर ! नोकरी म्हणजे हमालीच. पण त्या हमालीपेक्षां ही हमाली शतपटीनं बरी !

**विद्याधर :** पण हमाली करणं तोंडच्या गप्पा नाहींत. सराव हवा...शरीर धडधाकट हवं. तूं तर असा पेजेनं पोसलेला पाप्याचा पितर ! रडतराव !

**बाबूराव :** पण लोक तर मला गुबगुबीत टोणगा म्हणतात. त्यामुळं भीक मागायचीहि पंचाईत झाली आहे. हातींपायीं धड असलेल्या दांडगटाला कुत्रंसुद्धां भीक घालीत नाहीं. विद्याधर, कांहीं उपाय सांग बुवा ! इथेंच फूटपाथवर 'बूटपालीस' असं ओरडत बैठक मारूं ? कीं सरळ चोरी करूं ?

**विद्याधर :** चोरी ?

**बाबूराव :** हो ! म्हणजे अनायासें बिनभाड्याच्या घरांत पोटापाण्याची सोय तरी होईल सरकारकडून !

**विद्याधर :** अरे, तुरुंगांतच जायचं तर चोरी करून कां ?

**बाबूराव :** मग काय कायदेभंगी देशभक्त ठरून ? अच्छा ! उद्यांच खादीचं अंगडंटोपडं घालून पडतों चळवळींत नि होतों झटपट देशभक्त ! 'झेंडा ऊंचा रहे हमारा !'

[ विद्याधर हंसतो. बाबूराव खजील होतो.

हांस, बाबा, हांस ! जगानं हंसण्यासारखीच माझी शोचनीय अवस्था झालीय्.

**विद्याधर :** हंसूं नको तर काय रडूं ? भल्या गृहस्था, तुझ्या अकलेचं तट्टू असं वांकड्या वाटेनं कां उधळतंय् ?

**बाबूराव :** सरळ रस्ता दिसत नाहीं म्हणून. आपली तर अक्कल गुंग झाली बुवा !

**विद्याधर :** मी तुला एक सोपा, सीधा रस्ता सुचवितों...

**बाबूराव :** सोनापूरचा ?

**विद्याधर :** नव्हे. तुझ्याच घरचा. सरळ घरीं चल. पंतांची क्षमा माग. उद्यांपासून माझ्याबरोबर कारखान्यांत कामाला चल...

**बाबूराव :** म्हणजे ? तूं आमच्याच कारखान्यांत कामाला आहेस ?

**विद्याधर :** होय. वीणकाम, रंगकला यांचं प्रत्यक्ष शिक्षण घेतलं. आतां विलायतेला जाणार आहें...हे सर्व पंतांचे उपकार आहेत माझ्यावर ! तूं मात्र हातचं सोडून पळत्याच्या पाठीं धांवत राहिला आहेस.

**बाबूराव :** विद्याधर, उघड्या डोळ्यांनीं मूर्खासारखी खड्ड्यांत उडी घेतलीय् रे ! तोंड भरून बाबांची क्षमा मागतों... पण त्यांना आतां तोंड दाखवायलाच मला लाज वाटतेय्...कोणत्या तोंडानं घरीं चलूं ?...

**विद्याधर :** चल माझ्याबरोबर. मी घरींच निघालोंय्...आत्तां व्याख्यान आटपून आलों...

**बाबूराव :** व्याख्यान ? कुठं ?

**विद्याधर :** जिना हॉलमध्यें.

**बाबूराव :** विषय ?

**विद्याधर :** सुशिक्षितांची बेकारी !

**बाबूराव :** अरे, मग या विषयावर व्याख्यान द्यायला तुझ्यापेक्षां मीच अधिक लायक होतों. असं दणदणीत वक्तव्य केलं असतं!...'कॉलेज कुमारांनो! आणि कॉलेज–कुमारींनो! माझ्या भावांनो! आणि बहिणींनो! हा एक बेकार पदवीधरच तुम्हाला कंठरवानं गर्जून सांगतों आहे कीं, जगांत वाटेल तें अघोर पातक करा, पण पदव्यांच्या वेड्या छंदानं हें कुचकामी शिक्षण घेऊन आयुष्याचा सत्यानाश करून घेण्याचं महापातक करूं नका! हा आत्मघात थांबवा आणि उपयुक्त धंदेशिक्षणाची कांस धरा...'

**विद्याधर :** अरे एऽऽ पागल! कुठून सगळं पाठ केलंस हें?...

**बाबूराव :** थांब रे! मला पुरतं तरी बोलूंदे... 'देशाला प्रचंड प्रमाणांत सुशिक्षित बेकारांचा पुरवठा करणारी युनिव्हर्सिटी म्हणजे एक व्यापारी पेढी आहे...'

**विद्याधर :** उगीच काय बरळतोस? चल आतां. (पाहून) अरे, पण ते बघ, पंत चाललेत...

**बाबूराव :** अरे, मग तूं हो पुढं...मी थांबतों इथेंच....

**विद्याधर :** हात् लेका! एवढा काय घाबरतोस? अहो पंत, इकडे या. हा पहा बाबू....

[ नारोपंत येतात. बाबूराव गांगरतो.

**नारोपंत :** हे विद्वान् ग्रॅज्यूएट् इकडे कुठं? काय हो पदवीधर? बाबूराव बी. ए.!

**बाबूराव :** बाबा, मला क्षमा करा. माझं पदव्यांचं वेड संपलं. हें पहा माझं बी. ए. सर्टिफिकेट! यानंच आधीं तुमचे जोडे पुसतों नि मग हें अस्सं टरकावून टाकतों. माझ्या उद्दाम पागलपणाबद्दल मला क्षमा करा!

[ बाबूराव नारोपंतांचे पाय धरतो.

**विद्याधर :** (छद्मीपणानें) काय हें? बाबू, भररस्त्यांत पंतांचे पाय धरतोस? प्रतिष्ठित पदवीधर तूं...

**बाबूराव :** पदवी गेली चुलींत अन् प्रतिष्ठा गेली चुन्याच्या भट्टींत! माझ्या प्रेमळ बापाचे पाय असें भररस्त्यांत, एकदां सोडून हजारदां धरायला मी कुणाच्या बापाला भिणार नाहीं.

**नारोपंत :** ऊठ मूर्खा, सोड माझे पाय. विद्वत्तेची धुंदी उतरली? माणसांत आलास ना? ठीक झालं. विद्याधर, हा तुझा पासपोर्ट. आत्तांच हातीं आला. येत्या शनिवारची बोट. बाकीची सगळी व्यवस्था केलीच आहे...

**बाबूराव :** बाबा, मलासुद्धां याच्याबरोबर विलायतेला पाठवा ना?

**नारोपंत :** कशाला? वर आले नाहींत माझे पैसे.

**बाबूराव :** विलायतची यात्रा घडली तर तेवढाच दर्जा वाढेल माझा.

**नारोपंत :** स्वदेशांतच काय ते कर्तबगारीचे दिवे लाव अन् मग परदेशाला जाऊन अक्कल पाजळ. उद्यां विद्याधर अमेरिकेला गेला म्हणजे त्याच्या जागीं तुला काम करावं लागेल कारखान्यांत. समजलास? बजावून ठेवतों.

[ ४ ]

रावसाहेबांच्या बंगल्यांतील आधुनिक पद्धतीच्या सजावटीनं शृंगारलेला दर्शनी दिवाणखाना. सकाळची वेळ. फुलदाणींत ठेवण्यासाठीं ताज्या कळ्याफुलांचा गुच्छ घेऊन स्वच्छंदीवृत्तीनें पुढील गाणें म्हणत विजया बाहेरून येते.

रुसूं नको सखे कलिके बाई!
हांस ना! उमल गडे! कर घाई
ऋतु वसंत पहा
जादुगार हा आला!
नितांत माधुरीचा
साज साजरा ल्याला
बहरूदे नवतीची नवलाई!

[ गाण्याबरोबरच पुष्परचनाहि संपवून विजया एक दोन सपर्ण गुलाब वेणींत खोंवते व लगबगीनें जाऊं लागते. तोंच समोरून 'विजू–विजू' अशा हांका मारीत रावसाहेब माडीवरून खालीं येतात. किंचित थबकून विजया त्यांच्याकडे प्रश्नार्थक मुद्रेनें पहात रहाते.

**रावसाहेब :** काय ग विजू! विद्याधराची कांहीं वार्ता ? अलीकडं कुठं कांहीं कळलं का ? काय चाललेत त्याचे उद्योग ?

**विजया :** मला काय ठाऊक ? तुम्हाला आवडत नाहीं, तुम्ही नको म्हणा-लांत, म्हणून मी भाऊची चौकशीच करायचं सोडून दिलंय् आजकाल.

**रावसाहेब :** ठीक केलंस !

[ एक दीर्घ निश्वास सोडून रावसाहेब आरामखुर्चींत अंग टाकतात. मुद्रेवरून त्यांच्या कष्टी मनाची अस्वस्थता विजया ओळखते.

**विजया :** पण बाबा, आजच भाऊची आठवण व्हायचं कारण ?

**रावसाहेब :** अग, रोजच त्याची आठवण होते मला. कसं झालं तरी बापाचं आंतडं आहे माझं. कुठं वणवणत असेल पोरगं...

**विजया :** तुमचा स्वभाव भारीच संतापी नि हट्टी...अन् भाऊहि तसाच. रागीट नि एककल्ली. तुमचाच मुलगा ना तो ?

**रावसाहेब :** साऱ्या गोष्टी या थराला यायला नको होत्या. पण झालं तेंहि एकापरीनं ठीकच झालं म्हणायचं. अशीच अद्दल घडविल्याखेरीज असल्या बाजीरावाच्या बेट्यांना जगाचं खरं ज्ञान व्हायचं नाहीं.

[ इतक्यांत पत्रविक्या पोऱ्या 'टाईम्स' चा अंक टाकून जातो. विजया तो उचलून घेऊन चाळते व एकदम आनंदानें रावसाहे-बांकडे धांवत येते.

**विजया :** बाबा, बाबा, भाऊचा फोटो आलाय् टाईम्समध्यें...

**रावसाहेब :** ( आश्चर्यानें ) काय ? विद्याधराचा फोटो ? अन् टाईम्समध्यें ? कायदेभंगी बनून कार्टा तुरुंगाची हवा खायला गेला कीं सिनेमाचा स्टार झाला ?

**विजया :** छे हो बाबा ! आजच्याच बोटीनं भाऊ विलायतेला, अमेरिकेला निघाला आहे...

**रावसाहेब :** ( ताडकन् उठून ) अमेरिकेला ? काय म्हणतेस ? खरंच ? पाहूं...पाहूं...( विजयेच्या हातांतून खसकन् अंक ओढून घेऊन वाचतात. ) शाब्बास ! तरी म्हटलं माझा विद्याधर ! अहाहा ! धन्य, धन्य मी !... अशा स्वावलंबी, कर्तबगार कुलदीपक सुपुत्राचा पिता होण्याचं भाग्य मला लाभलं ! ( एकदम धांदलीनं ) अग पण विजू , चल, चल झटपट...माझे कपडे आण...गाडी बोलाव...आधीं मला डेकवर जाऊंदे...बोटीवर पाय ठेवण्यापूर्वी माझ्या लाडक्या विद्याधराला मला एकदां डोळे भरून पाहूंदे... प्रेमाश्रूंनीं न्हाऊं घालूंदे...

**विजया :** पण एवढी काय धांदल आहे ? आपणाला भेटल्याखेरीज का भाऊ जाणार आहे विलायतेला ?

[ विद्याधर येतो.

**विद्याधर :** शक्यच नाहीं.

**विजया :** भाऊ !

**रावसाहेब :** विद्याधर ! विद्याधर ! माझा बाळ...( धांवत जाऊन पोटाशीं कुर्वाळतात. )

**विद्याधर :** बाबा, मला क्षमा करा.

**रावसाहेब :** बाळ, तूंच मला क्षमा कर. तुझ्याशीं मी निर्दयपणान वागलों...तुला घराबाहेर लोटलं...

**विद्याधर :** पण त्यामुळंच तर आजचा हा सोन्याचा दिवस माझ्या आयुष्यांत उगवला !

**विजया :** होतं तें सारं बऱ्यासाठींच होतं, असंच ना ? ( हंसते. )

**रावसाहेब :** वाहिली ती गंगा नि राहिलं तें तीर्थ !

**विद्याधर :** हिंदुस्थान सोडण्यापूर्वी आशीर्वादाच्या आशेनं मी तुमच्या पायांकडे धांव घेतली. ( पायां पडतो. )

**रावसाहेब :** अखंड विजयी हो ! दीर्घायुषी हो ! पण प्रथम हें सांग, हा परदेशगमनाचा योग आला कसा ? तूं होतास तरी कुठं इतके दिवस ?

**विद्याधर :** म्हणजे ? विजूताईनं तुम्हांला कांहीं सांगितलं नाहीं ?

**रावसाहेब :** नाहीं.

**विद्याधर :** तिला सारी इत्थंभूत हकीकत ठाऊक आहे.

[ विजया मोठ्यांदा हंसते.

**रावसाहेब :** विजू ! अग लबाडे ! मला थांगपत्ता लागूं दिला नाहींस अँ !

**विजया :** भाऊचं नांव काढलं कीं तुमच्या कपाळावर आंठ्या चढायच्या...

**रावसाहेब :** पण एका शब्दानं तरी कधीं सांगायचंस्...

[ नारोपंत व दया येतात.

**नारोपंत :** काय सांगायचं रे तुला ? मी सांगतों. हा तुझा विद्याधर, आज सहा महिने माझ्या कारखान्यांत काम करीत होता. मजूरापासून मॅनेजरपर्यंत सारीं कामं केलीं यानं. आज मी त्याला विलायतेला पाठवतों आहें, माझ्या धंद्याचं उच्च शिक्षण घेण्यासाठीं. गारगोटी समजून तूं याला घराबाहेर जगाच्या उकीरड्यावर फेंकलास ! पण उद्यां पहा, हेंच तुझं पुत्ररत्न नामांकित नर-रत्नांच्या मालिकेंतला मेरुमणि शोभेल !

**रावसाहेब :** पंत ! तुझे उपकार मी कसे फेडूं ?

**नारोपंत :** शंभरदां भेटीगांठीं झाल्या आपल्या. पण आजवर मी या गोष्टीची गंधवार्ता लागूं दिली नाहीं तुला.

**रावसाहेब :** तसा तूं पक्का वस्ताद आहेस रे ! हो, पण याच्या विलायतच्या खर्चाची व्यवस्था ?

**नारोपंत :** सांगितलं ना ? मी त्याला पाठवितोंय्. तुला पैचा खर्च नाहीं.

**रावसाहेब :** तसं नव्हे रे ! मी या क्षणीं दहा हजारांचा चेक...

**नारोपंत :** तुझ्याजवळच ठेव तुझे ते दहा हजार ! रावसाहेब, अरे, मी व्यापारी माणूस आहें. हिशोबी आहे. उगाच पैसा ओतीत नाहीं मी. जांवयाला अगाऊ वरदक्षिणा म्हणूनच हा विलायतचा खर्च...

**रावसाहेब :** म्हणजे ? म्हणतोस तरी काय ?

**नारोपंत :** दुसरं काय ? ही माझी मुलगी दया ! तुझी सून होणार !

बांधून आपण एवढा माझा गौरव करताहांत! या रत्नावरून दुनियेची दौलत मी ओंवाळून टाकतों! विनंति एवढीच, कीं आम्ही आपले आहोंत हे असे आहोंत ! आम्हाला तुम्ही सांभाळून घ्यावं.

**रावसाहेब :** ठीक आहे! वधूवर नेमस्त झालेच आहेत. विलायतेहून विद्याधर परत आला कीं, पहिल्याच सुमुहूर्तावर एकाच मंडपांत दोन्हीं मंगलकार्यं धूमधडाक्यानं सजारीं होणार!

[ बाबी व बबन ' बघ जीवन–रणसंग्राम ' हें गाणें म्हणत येतात.

**नारोपंत :** अरेच्या ! तुम्हीहि आलांत !

**रावसाहेब :** अन् हें लढाईचं गाणं काय म्हणतांय् !

**बबन :** ( विद्याधराकडे पाहून ) यांनींच शिकवलंय हें गाणं आम्हाला.

**रावसाहेब :** अस्सं ! पण इथें तर लग्नाच्या गोष्टी चालल्या आहेत !

**बाबूराव :** लग्न अन् लढाई एकच की !

**विद्याधर :** किंबहुना, लग्न करून संसार थाटल्यानंतरच मनुष्याच्या खऱ्या-खुऱ्या जीवनसंग्रामाला प्रारंभ होतो !

**नारोपंत :** खरं आहे.

[ सारे हंसतात. बाबी व बबन पुन्हां गाणें सुरू करतात. पडदा पडतो.



## पात्रें :

[ प्रवेशाच्या अनुक्रमानें ]

त्रिवेणी

सुमन

मालती

लीला

सुगंधा

मंदाकिनी

रखमाई

बायजा

आईसाहेब

शिवाय शोभना, माईसाहेब, अन्नपूर्णाबाई वगैरे.

---

**प्रवेश पहिला :** मकरसंक्रांतीचा दिवस. माटुंगा येथील सुगंधाचें घर. दुपारीं दोनचा सुमार.

**प्रवेश दुसरा :** त्याच दिवशीं संध्याकाळीं साडेपांच वाजतां. 'भगिनी-समाज' विलेपार्ले.

**प्रवेश तिसरा :** दिवस तोच. रात्रीं आठाच्या सुमारास. सुगंधाचे घरीं.

**प्रवेश चौथा :** त्यानंतर जराशा वेळानें. मंदाकिनीच्या घरीं.

# समाजसेविका

सुगंधाचें घर. दारावर ‘ महिला–मंडळ ’ असा बोर्ड दिसतो. बाहेरील प्रशस्त व्हरांड्यांत कांहीं मुली पुढील गाणें म्हणत आहेत.

गिरिधारी हरी चित्तचोर !
सुचूं दे ना बाई ! मुलीं कामकाज
माझ्या जीवाचा राजाधिराज
ल्यालासे आज नवलाचा साज
उधळीत आनंद नंदकिशोर !

सखे ! सदा खेळे नयनीं मनीं
बालमुकुंद चंद्राची कोर
डुलवीत भुलवीत हृदयचकोर !
श्रीरंग माझ्या अंगणीं आला
शामसुंदर बांसरीवाला
हांसत नाचत राहे समोर !

**त्रिवेणी :** पुरे झालीं बाई हीं गाणीं ! आतां आपण झिम्मा खेळूंया. ये ग सुमन !

‘ झिम्मा खेळूं ये ग झिम्मा खेळूं ये !
आकाशींच्या ताऱ्यांसंगें झिम्मा खेळूं ये ! ’

**सुमन :** कांहीं नको झिम्मा...

**मालती :** लीला, चल ग, तूं नि मी झिम्मा खेळूंया...

**लीला :** ‘ झिम् पोरी झिम् ! कपाळाचं भिंग !
भिंग गेलं फुटून ! पोरी गेल्या उठून ! ’

**सुमन :** गेल्या उठून पोरी तर जाऊंदेत ! पुरे झाला तुमचा झिम्मा ! एक म्हणजे अगदीं एकच ! छक्कापाणी...फुगड्या...

**त्रिवेणी :** खरंच गडे ! फुगड्याच खेळूं आपण. सुमन, तूं नि मी...

मैत्रिणी मैत्रिणी जोडीच्या
हातांत पाटल्या तोडीच्या

[ मुली उखाणे घेत फुगड्या खेळून गोंधळ मांडतात. सुगंधा येते.

**सुगंधा :** अग, जरा शांतपणानं खेळा. असं घर घेऊं नका डोकीवर.

[ दारांत मोटार थांबल्याचा आवाज ऐकूं येतो.

**त्रिवेणी :** कोण आलं ?

[ मंदाकिनी येते.

**सुगंधा :** अय्या ! हें उंबराचं फूल आज इकडे कुठून उगवलं ! या–या तुम्ही डॉक्टरीणबाई !

**मंदाकिनी :** गुड् नून ! सुगंधा !

**सुगंधा :** नमस्ते ! पण मंदा ! आज इकडे कुठं रस्ता चुकलीस ? अन् या वेळीं ?

**मंदाकिनी :** मावशीकडे गेलें होतें अंधेरीला. म्हटलं, येतां येतां भेटावं मास्तरीणकाकूंना...

**सुगंधा :** कित्ती दिवसांनीं भेटलीस !

**मंदाकिनी :** मेली फुरसतच मिळत नाहीं.

**सुगंधा :** पण आज तरी स्वस्थपणानं आली आहेस ना ? कीं घोडं उभं केलं आहेस बाहेर ?

**मंदाकिनी :** घोडं नव्हे पण माझी नवी मोटार बरीक उभी आहे बाहेर !

**सुगंधा :** ( हंसून ) खरंच ! तूं आतां डॉ. मिस् मंदाकिनी ! एम्. बी. बी. एस्. बॉम्बे !...एल्. एम्. रोटंडा ! केवढा तुझा रुबाब ! तूं आतां ती पूर्वीची वेंधळी मंदा थोडीच उरली आहेस ! माझ्यासारख्या गरीब बाळ-मैत्रिणीची अजून ओळख तरी ठेवली आहेस, हेंच विशेष !...पण बसशील कीं नाहीं ? कीं उभ्या उभ्याच दर्शन देऊन जाणार आहेस ? दादर नि माहीम...दहा पांच मिनिटांचा रस्ता...पण सहा सहा महिन्यांत गांठभेट होत नाहीं तुझी !

**मंदाकिनी :** तुला तरी कधीं होते का माझी आठवण ?

**सुगंधा :** आठवण खूप होते पण सवड तर सांपडायला हवी ? शाळा संभाळून...

**मंदाकिनी :** अवांतर देशकार्यांचे व्याप संभाळून म्हण. तुला तेवढी शाळा, नि मला माझा दवाखाना नाहीं वाटतं ?

**सुगंधा :** तुझं काय बाई ! तुझी तूं स्वतंत्र आहेस. पण आमचा पडला नोकरपेशा !

**मंदाकिनी :** स्वतंत्र धंद्यापेक्षां नोकरीच फार सुखाची, आरामाची.

**सुगंधा :** ती कशी ?

**मंदाकिनी :** नोकरींत फक्त एकाच वरिष्ठाची काय ती ताबेदारी. पण स्वतंत्र व्यवसायांतलं माणूस सदासर्वदा सर्वांनाच बांधलेलं. त्यांतून डॉक्टर म्हणजे चोवीस तास लोकांचा नोकर !

**सुगंधा :** 'जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति !'

**मंदाकिनी :** तुला सुचतेय् थट्टा. पण 'जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे !' आजच पहा ना ! सक्काळपासून अश्शी उभी आहें मी...

**सुगंधा :** मग बैस तर आतां जरा निवांतपणानं. सुमन, त्या खुर्च्या आण.

[ सुमन खुर्च्या आणते. दोघी बसतात.

**मंदाकिनी :** बसतेय् कसली ? घरींसुद्धां पांच मिनिटं सवड सांपडत नाहीं बसायला...

**सुगंधा :** नाहींतरी घरीं असतेस कधीं तूं ? पहिल्यापाजून तुझं असंच... अष्टोप्रहर गांवभर चकरा नि रिकामा नखरा !

**मंदाकिनी :** वा ग वा ! रिकामं हिंडण्याची हौस आहे वाटतं मला ? सार्वजनिक कार्यांची जबाबदारी...जीव मेटाकुटीला येतो...

**सुगंधा :** तर–तर ! थोर समाजसेविकाच तूं !

**मंदाकिनी :** रात्रंदिवस कामाचा रामरगाडा ! घरीं नि बाहेर...

**सुगंधा :** घरच्या घरीं तर दवाखाना...

**मंदाकिनी :** हो. अन् घराचाहि पण दवाखानाच झालाय् आजकाल...

**सुगंधा :** म्हणजे ?

**मंदाकिनी :** घरीं सर्वांनीं अंथरूण धरलंय्. कुणाला ताप तर कुणाला फिटस् ! कुणाच्या पोटांत वायगोळा तर कुणाच्या छातींत कळा ! वैतायगलेंय् साऱ्या कर्मकटकटीला. ..दर्शन नको घराचं अस्सं झालंय्...आज कसाबसा दवाखाना संपविला नि सक्काळींच पळ काढला घराबाहेर ! कामं होतींच म्हणा—

**सुगंधा :** छाऽऽन ! घरीं माणसं आजारी नि तूं भटकतेस बाहेर !

**मंदाकिनी :** ( हंसून ) ' हें विश्वचि माझें घर ! '

**सुगंधा :** खरं आहे. मग तुझ्या मतें स्वतांच्या घरादाराची उपेक्षा करून बाहेरच्या नसत्या उठाठेवी करीत फिरणारी प्रत्येक बेजबाबदार गांवगौरी बडी समाज सेविकाच ठरणार !

**मंदाकिनी :** देशसेवेचं सतीचं वाण घेतल्यावर घरादाराची चिंता कोण करणार ?

**सुगंधा :** पण जें माणूस आपल्या घरावर प्रेम करूं शकत नाहीं तें देशावर कितपत प्रेम करणार, स्पष्टच आहे. म्हणे देशसेवा !

**मंदाकिनी :** बरं पण तुझी देशसेवा सुरळीत चाललीय् ना ? काय म्हणतंय् तुझं ' महिलामंडळ ' ? सुखरूप आहे ना ?

**सुगंधा :** आमची गरीबांची कसली देशसेवा !

**मंदाकिनी :** कां बरं ? साक्षरता-प्रसार, हरिजनांचा उद्धार, खादीचा प्रचार ! सगळाच रिकामटेकडा कारभार ! ( मोठ्यांदा हंसते. )

[ अस्पृश्यांच्या कांहीं मुली येतात.

**सुगंधा :** या बाळांनो !

**मुली :** नमस्ते !

**सुगंधा :** नमस्ते ! अग लीला, यांना घ्या तुमच्यांत खेळायला...

**लीला :** चिंगे, रंगे, चला ग !

[ सर्व मुली खेळूं लागतात.

**मंदाकिनी :** ( त्रासून ) बाई ! बाई ! काय हुदड्या घालताहेत या पोरी ! कपाळ उठलं कलकलाटानं. सुगंधा, आधीं त्यांना हांकलून दे पाहूं येथून...

**सुगंधा :** बाळांनो ! तिकडे पलीकडे खेळा. जा.

**मंदाकिनी :** तुझं नाहीं डोकं उठत या त्रासानं ?

**सुगंधा :** हंसरीं मुलं म्हणजे उमलणारीं फुलं ! अन् त्यांचा त्रास ?

**मंदाकिनी :** बाकी, असा पोरवडा, म्हारवडा रोजच तूं घरीं गोळा करून बसतेस म्हणा !

**सुगंधा :** या चिमण्या पांखरांची गोड किलबिल ऐकली कीं माझं तर मन कसं आनंदानं फुलून जातं! रोजच जमतात या मुली इथं शिकायला. पण आज...

**मंदाकिनी :** कांहीं तरी विशेष समारंभ दिसतोय्.

**सुगंधा :** आज संक्रांत ना?

**मंदाकिनी :** सालाबादप्रमाणं सार्वजनिक हळदीकुंकूं! होय ना? मग तुझ्या या गडबडींत माझी संक्रांत उगीच वळली म्हणायची इकडे!

**सुगंधा :** वा! अनायासें तुझ्या भेटीचा लाभ झाला. दुधांत साखर पडल्याचा आनंद वाटेल सगळ्या बायकांना.

**मंदाकिनी :** पण काय ग सुगंधा, एवढ्या तुम्ही स्वतांला सुशिक्षित, सुसंस्कृत, स्वतंत्र बुद्धीच्या म्हणवितां अन् तुमचे आचारविचार असे कसे अगदींच पुराणकाळचे, जुनाट, बुरसलेले? हळदीकुंकूं ग कसलं करतां कपाळाचं?

**सुगंधा :** आम्ही आहोंत आपल्या सनातनी! तुझ्यासारख्या सुधारक, नवमतवादी कुठं आहोंत?

**मंदाकिनी :** पक्क्या पुढारलेल्या आहांत कीं! पण हिंदूपणा...हाडींमांसीं खिळलेला हिंदूपणा...तो कसा जाईल?

**सुगंधा :** आम्हाला आमच्या हिंदुत्वाचा अभिमानच आहे. तुमचे ते विलायती सुधारणेचे चोचले आम्हाला रुचत नाहींत अन् पचतहि नाहींत. असले हे धार्मिक उत्सव-समारंभ राष्ट्रसंस्कृतीचे द्योतक असतात. समाजसंघटणेच्या दृष्टीनंहि उपयुक्तच ठरतात. आर्यसंस्कृतीचीं उज्ज्वल तत्त्वं...

**मंदाकिनी :** नॉन्सेन्स! अजागळासारखे वेडगळ चाळे करायचे नि म्हणायचं आर्यसंस्कृति! उच्च शिक्षणाचा ह्याच का परिणाम? माणसाला मुख्य म्हणजे कल्चर पाहिजे...

**सुगंधा :** आम्ही कुठं आहोंत तुझ्यासारख्या कल्चर्ड! तुझे आचारविचार कल्चर्ड! सारंच वागणं खोटं, वरवरचं. खरं कांहींच नाहीं. पोशाखी भपका नि जगाकडून ठपका!

**मंदाकिनी :** पण माणसानं सुधारलेल्या जगाबरोबर चालावं कीं संक्रांत, किंक्रांत, गौरी, हरतालिका पूजीत मागेंच रेंगाळत राहावं ? जग झपाट्यानं पुढं पुढं धांवतंय् ! देशकालपरिस्थितीप्रमाणं तरी वागावं...

**सुगंधा :** होय ना ? मग देशाची परिस्थिति तुला दिसत का नाहीं ? स्वातंत्र्य नष्टच झालं अन् आतां धर्मसंस्कृतीसुद्धां रसातळाला चाललीय्...

**मंदाकिनी :** म्हणून तुम्ही त्या धर्मसंस्कृतीच्या कोसळत्या मंदीराला सांवरून धरताय् वाटतं ? ( हंसते. )

**सुगंधा :** आम्ही स्त्रियांनींच आजवर धर्मसंस्कृतीचं रक्षण केलं आहे अन् पुढंहि केलं पाहिजे. स्वातंत्र्ययुद्धांतसुद्धां धडाडीनं भाग घेऊन आम्ही स्त्रियांनीं केवढी कामगिरी केली !

**मंदाकिनी :** हो तर ! त्या केशरी साड्या, त्या प्रभातफेऱ्या, त्या मिरवणुकी, तें पिकेटिंग...कायेदेभंगाच्या चळवळींत देशसेविकांनीं राष्ट्राचं राजकारण रंगारूपाला आणलं खरं !

**सुगंधा :** हेटाळणीनं हंसणं सोपं आहे. हरघडी रंगीत बाहुलीप्रमाणं नटूनथटून मिरविणाऱ्या, निष्काळजी फुलपांखराचं स्वच्छंदी विलासी जिणं कंठणाऱ्या नाजुक रंभा तुम्ही ! तुम्ही कशाला देशपरिस्थितीच्या गोष्टी बोलाव्यात ?

**मंदाकिनी :** वाटलंच होतं मला तुझ्या अंगांत असं देशभक्तीचं भूत संचारणार म्हणून...चालूंदे तुझी टकळी. पण अजून तूं खादी-टकळीचं पुराण कसं नाहीं आरंभलंस ?

**सुगंधा :** तुला सारी थट्टाच वाटते. पण मंदा, सार्वजनिक कार्यांत कळकळीनं, जबाबदारीनं भाग घेऊन तूं आपल्या बुद्धीचा, शिक्षणाचा, संपत्तीचा सदुपयोग समाजहितासाठीं करशील तर...

**मंदाकिनी :** रोजचंच चाललंय् माझं समाजहिताचं कार्य. स्त्रियांच्या प्रत्येक संस्थेशीं माझा संबंध आहे. सेक्रेटरी, अध्यक्ष, उपाध्यक्ष, सभासद, निदान हितचिंतक...कांहींना कांहीं संबंध आहेच. आत्तांपर्यंत निदान दोन डझन तरी सणसणीत लेख लिहिले असतील मी स्त्रियांच्या उन्नतीवर...दणदणीत व्याख्यानंहि दिलीं आहेत पुष्कळ.

**सुगंधा :** ही सारी बडेजावी ठीक आहे. पण मंदा, केवळ कलमबहादुरीनं अन् व्याख्यानबाजीनं समाजसेवा होत नसते. स्वार्थ सोडून प्रत्यक्ष कार्य केलं पाहिजे. चंदनाप्रमाणं झिजलं पाहिजे. स्वार्थत्यागाशिवाय समाजसेवा व्यर्थ आहे. त्याग ह्याच सेवाप्रीतीचा पाया आहे. तुझ्या मनांत निष्ठा नाहीं, त्याग-बुद्धि नाहीं. स्वतांपुरतं पहाणारी, सुखविलासांना हपापलेली तूं...तुझ्या हातून समाजहिताचं भरीव कार्य कसं होणार ?

**मंदाकिनी :** तूं आहेस मवाळ आजीबाई ! माझे बंडखोर, जहाल विचार तुला पटायचे नाहींत. समाजसेवेचं माझं तत्त्व निराळं, तुझं निराळं.

**सुगंधा :** तुझं तत्त्व क्रियाशून्य...

**मंदाकिनी :** अन् तुझी क्रिया तत्त्वशून्य ! पण पुरे झाला हा वितंडवाद. तुझ्या तत्त्वज्ञानाचे डोस त्या शेंबड्या, परकऱ्या पोरींना पाजवीत बैस. जातें बाई आतां. ( मनगटावरील घड्याळांत पाहून ) अय्या ! साडेचार वाजले ! गेलंच पाहिजे मला...

**सुगंधा :** एवढी कसली घाई ?

**मंदाकिनी :** अग, माझं व्याख्यान आहे आज पार्ल्याला भगिनीसमाजांत साडेपांचला. घरीं जाऊन पुन्हां मला लगेच परतलं पाहिजे. अजून सारी तयारी व्हायची आहे माझी...

**सुगंधा :** कसली ? भाषण तर आधींच लिहून काढून पाठ केलं असशील !

**मंदाकिनी :** ( हंसून ) पण कपडे ? हा जामानिमा नको उतरायला ?

**सुगंधा :** म्हणजे ? व्याख्यानाचा पोशाख निराळा ?

**मंदाकिनी :** ऑफ कोर्स !...हो खरंच. तुझ्याकडे असेलच कीं खादीचं पातळ नि ब्लाऊज ?

**सुगंधा :** नसायला काय झालं ? पण काय ग, व्याख्यानाचा विषय तरी कोणता ?

**मंदाकिनी :** विषय ? एकदम नवीन ! 'संक्रांतीचा संदेश' ! आज मकरसंक्रांत !...

**सुगंधा :** होय. पण आत्तांच तूं तोंडसुख घेतलंस ना संक्रांतीसारख्या सणांवर नि उत्सवांवर ? केवढा वादंग माजविलास अन् पुन्हां संक्रांतीचा संदेश सांगायला निघालीस ? तुझीं खरीं मतं तरी कोणतीं ?

**मंदाकिनी :** खाजगीं मतं वेगळीं नि सार्वजनिक मतं वेगळीं !

**सुगंधा :** खायचे दांत निराळे नि दाखवायचे दांत निराळे ! असंच ना ?

**मंदाकिनी :** अग, असं वागल्याखेरीज...

**सुगंधा :** सवंग कीर्ति नि प्रतिष्ठा मिळणार नाहीं खरंच !

**मंदाकिनी :** पण चल, आधीं तुझं पातळ दाखव. आतां असंच करतें. घरीं न जातां येथूनच परस्पर पार्ले गांठतें...

**सुगंधा :** मी देतें तुला सगळं. घरचा हेलपाटा वांचवितें तुझा. काळजी करूं नकोस.

**मंदाकिनी :** हेलपाट्याचं नव्हे ग. पण घरीं गेलें कीं आमच्या आईसाहेब पिच्छा पुरवतील माझा...

**सुगंधा :** पार्ल्याला येण्यासाठीं ?

**मंदाकिनी :** हो. घरीं माझी वाटच बघत बसली असेल आई...कालपासूनच तिनं टुमणं लावलंय्...अन् तुला घेऊन जाईन अशी मीहि तिला थाप दिलीय्...

**सुगंधा :** मग जा घेऊन. लोकांनीं केलेलं लेकीचं कोडकौतुक त्यांना जर प्रत्यक्ष डोळ्यांनीं पहायचंय्...

**मंदाकिनी :** इश्श् ! पण मी कुठं नेऊं तिला मिरवीत माझ्याबरोबर ?

**सुगंधा :** कां ? मोठेपणाला बाध येईल ? प्रत्यक्ष आपल्या आईची एवढी साधी इच्छा तूं तृप्त करीत नाहींस अं !

**मंदाकिनी :** मी कुठं तिचं प्रदर्शन बरोबर हिंडवूं ? लोकांनीं हंसायला ? हवं असलं तर येईल ती परस्पर एकटीच...

**सुगंधा :** म्हातारं माणूस बरोबर न्यायचं सोडून...

**मंदाकिनी :** तुझं पुरे ! चल, तुझं पातळ दाखीव. खादीचं असलं तरी चांगलं हलकं, लांबरुंद आहे ना ?

[ सुगंधा व मंदाकिनी जातात. मुली येतात.

**सुमन :** ( त्रिवेणीस ) बाईंना विचारून आपण जाऊंया मंदाबाईंच्या व्याख्यानाला.

**त्रिवेणी :** कुठं ? पार्ल्याला ? शहाणीच आहेस. अन् काय ऐकायचंय् त्यांच्या व्याख्यानांत ? त्यांचं व्याख्यान म्हणजे हरदासी आख्यान !

**लीला :** परवां आपल्या शाळेंत नव्हतं का झालं ? तासभर बडबडली, पण ती काय बोलली, तेंच कांहीं कुणाला कळलं नाहीं.

**मालती :** बोलून चालून महापंडिता ती ! तिच्या भाषणाला कुठला शेंडा नि बुडखा ! ( हंसते )

**त्रिवेणी :** तोंडाला येईल तें बडबडायचं ! मुख्य विषयाला धरून बोलेल तर विद्वान् कोण म्हणेल तिला ? ( हंसते )

**सुमन :** तूं कधीं कुणाला चांगलं म्हटलयंस् ! सारं जग मंदाबाईंना नांवाजतंय.

**त्रिवेणी :** तर तर ! काय चालणं, काय बोलणं ! मुलुखावेगळंच वागणं ! म्हणे समाजसेवा करते नि गोरगरीबांचं हित पहाते ! स्वतांचं हित पहाते खरी. आमच्या सुगंधाबाई लोकांसाठीं इतकं करतात पण कधीं आपल्या नांवाचा डांगोरा पिटीत नाहींत कीं शहाणपणाचा टेंभा मिरवीत नाहींत. पण मंदाबाईची देशसेवा फक्त बोलण्यांत. आचरणांत नाहीं. सगळं जग जाणतंय् तिचीं सोंगं ढोंगं...

**सुमन :** ( पाहून ) अग, पण तें बघ त्यांचं सोंग !

**मालती :** अहाहा ! काय पण अवतार दिसतोय् !

**त्रिवेणी :** अग, ही व्याख्यानाची तयारी !

**लीला :** अय्या ! कुंकवाची टिकली, हातांत बांगड्या, सरळ भांग...

**मालती :** जॉर्जेटचं पातळ सोडून खादीचं शुभ्र पातळ नेसलीय् !

**त्रिवेणी :** पहा कशी नाटकी आहे ती !

**सुमन :** अग, गप्प ! इकडेच आल्या त्या...

[ सुगंधा व मंदाकिनी येतात.

**सुगंधा :** मंदा ! कित्ती सुंदर दिसतेस तूं या साध्या पोशाखांत !

**मंदाकिनी :** अगदीं बावळट, आदर्श देशसेविका दिसतें ना ?

[ मुली हंसतात. मंदाकिनी ओशाळते ]

**सुगंधा :** त्रिवेणी, उभ्या काय राहिलांत ? आत्तां बायका यायला लागतील. बैठकी घाला. हळदीकुंकवाची तयारी करा...तिळगुळाचीं ताटं भरा...

**त्रिवेणी :** हो–हो–झटपट करतों आम्ही सारं. चला ग.

[ मुली जातात. दुसऱ्या बाजूनें एक म्हातारी बाई लहान पोरीला घेऊन येते. पोरगी कण्हत असते.

**सुगंधा :** काय रखमाई ! बरं नाहीं वाटतं नातीला ?

**रखमाई :** काल सक्काळपास्नं इस्तवावानी आंग तापलंय् पोरीचं. काय सांगूं बाईसाब...( रडूं लागते. )

**सुगंधा :** हात् वेडे ! एवढी काय घाबरतेस ? जाईल निघून ताप.

**रखमाई :** कालपास्नं झांकूनशान ठेवलंया पोरीला...अक्षी हैरान झालंया लेंकरू...पानीबी त्वांडांत घीना...

**सुगंधा :** अग, मग डॉक्टरला दाखवावं कीं नाहीं ताबडतोब ?...

**रखमाई :** धांवलें डागदराकडं...पन् त्यो अदुगर फीचं पैसं दिल्याबिगर पोरीला हातबी लावाया तयार न्हाई...तीन रुपयं मागतुया...म्या गरीबानं कुठलं आनावं तीन रुपये...येळंला तुकडा मिळायची मारामार...बाईसाब, तुमीच आतां लेंकराला पदराखालीं घेऊनशान् वांचवा हो ! माज्या काळजानं तर अक्षी ठावच सोडलाया...पोरकं प्वार...जीवापल्याड जतन केलं...असं इक्तं नव्हतं कंदी तापानं बेजार झालं...

**सुगंधा :** कालच्या काल सांगायचं नाहीं ? लगेच नसती का व्यवस्था केली औषधपाण्याची ? तरी बरं वेळेवर आलीस...अनायासें डॉक्टरीणबाईही इथंच आहेत ह्यावेळीं...मंदा, या पोरीला जरा बघ ग—

**मंदाकिनी :** मला नाहीं फुरसत.

**रखमाई :** डागदरीण बाई ! गरीबाचा दुवा घ्या...द्या हो माज्या पोरीला दवा. ही बगा, तुमच्या पायावर घालते हिला...दया येऊंदे गरीबाची...लई उपकार व्हतील...पोरीचं परान वांचवा...

[ रखमाई पोरीला मंदाकिनीच्या पायाशीं ठेवते. ती तिला लाथाडते. पोरगी ओरडते.

**मंदाकिनी :** चल हो दूर. भिकारडे मेले ! उगीच त्रास देतात.

**सुगंधा :** ( रागानें ) मंदा ! मंदा ! शुद्धीवर आहेस का तूं ? आजारी पोरीला लाथाडतेस ? ( पोरीला उचलून पोटाशीं कुरवाळीत ) तुला कांहीं काळीज ? माणुसकी ?

**मंदाकिनी :** अग, अशा कैक कंगाल बायाबापड्या उगीच उठल्यासुठल्या सतावून सोडतात...

**सुगंधा :** पण ती कांहीं तुझ्या दारांत आली नव्हती. ती आली माझ्याकडे. माझ्यासाठीं तरी थोडी माणुसकी दाखवायची होतीस. पोरीला नव्हे तर एकापरीनं मलाच लाथाडलंस तूं...

**मंदाकिनी :** भारीच बाई तूं तरी. फुकट राईचा पर्वत करून तणतणतेस. ( रखमाईस ) ए बाई, तुला औषध हवं असेल पोरीसाठीं तर उद्यां सकाळीं ये माझ्या दवाखान्यांत तिला घेऊन दादरला...

**रखमाई :** आत्तांच द्या ना दवा...

**मंदाकिनी :** अग, बरोबर का बाळगलाय् मी दवाखाना ? रात्रींतून कांहीं धाड होत नाहीं पोरीला. उद्यां पैसे घेऊन ये औषधाचे...अन् मग...

**रखमाई :** तुमीबी पैसं मांगतां...

**मंदाकिनी :** मग ? औषधं काय मोफत मिळतात ? दिडक्या खर्चायला नसतील तर जा म्युनिसिपालिटीच्या दवाखान्यांत...

**रखमाई :** बरं ग बया ! ( उठून जाऊं लागते )

**सुगंधा :** रखमाई, बैस जरा तिकडे. मी करतें तुझ्या पोरीच्या औषधाची सोय.

[ रखमाई पोरीला घेऊन जाते.

**मंदाकिनी :** छे बाई ! मला तर हंसूंच येतं या दरिद्री, अडाणी लोकांचं.

**सुगंधा :** गरीबांचं दैन्य बघून तुला हंसूं येतं...आनंदाच्या उकळ्या

फुटतात अं ! मंदा, परोपकाराला पोषक असा तुझा डॉक्टरीचा व्यवसाय ! घरची पिढीजात श्रीमंती ! अन् गोरगरीबांशीं काय ही तुझी तुसडेपणाची उद्दाम वागणूक !

**मंदाकिनी :** अग, या लोकांशीं असंच वागावं लागतं.

**सुगंधा :** जनाची नाहीं पण मनाची तरी कांहीं...

**मंदाकिनी :** तूं तेवढी गरीबांची कैवारीण अन् मी काय वैरीण आहे ? पण व्यवहारांत वागतांना...

**सुगंधा :** शिष्टाचार, सौजन्य, भूतदया...चट्ट सारं विसरावं लागतं वाटतं ? श्रीमंतीची, प्रतिष्ठेची धुंदी तुम्हाला ! दुसरं काय ? पायदळीं पडलेल्या अनाथ, आजारी लेंकराला लाथाडलं अन् चालली आतां समाजसेवेवर व्याख्यान झोडायला !

[ सुगंधा व मंदाकिनी बोलत बोलत बाहेर रस्त्यावर येतात. तोंच त्यांना दूर नाक्यावर लोकांची गर्दी दिसते.

**सुगंधा :** अग, पण ती गर्दी कसली ?

**मंदाकिनी :** झाला असेल एखादा ॲक्सीडंट. नाहींतर...

[ त्या बाजूनें येणाऱ्या एका मुलीस सुगंधा थांबविते.

**सुगंधा :** बाळ, ती गर्दी ग कसली तिकडे ?

**मुलगी :** मोटारींची टक्कर झाली...एका म्हातारीचं डोकं फुटलं...

**सुगंधा :** अरे देवा ! खरंच ?

**मुलगी :** नेली तिला तशीच इस्पितळांत...( जाते. )

**सुगंधा :** मंदा !

**मंदाकिनी :** ( हंसून ) काय म्हणतेस बाई ? त्या म्हातारीच्या शुश्रूषेला जा म्हणून मला फर्मावितेस कीं काय ? हो, नेम काय ? मेणाहून मऊ तुझं मन...

**सुगंधा :** अशा प्रसंगीं धावलंच पाहिजे माणसानं मदतीला. डॉक्टरनं तर आधीं...

**मंदाकिनी :** होय तर ! आजारी पडलेल्या, अपघातांत सांपडलेल्या साऱ्या

लोकांच्या मोफत सेवाशुश्रूषेचा मक्ताच घेतलेला असतो कीं नाहीं प्रत्येक डॉक्टरानं ?

**सुगंधा :** मग तुमचा उपयोग काय समाजाला ? समाजसेविका म्हणून मिरवायचं तर...

**मंदाकिनी :** ( त्रासून ) पुरे बाई ! जातेंच आतां. तुझं व्याख्यान ऐकतां ऐकतां माझं व्याख्यान तिकडे तसंच राहायचं ! ( जाऊं लागते. परत वळून ) व्याख्यान आटोपून थेट आधीं इकडेच येईन हं ! ( जाते. )

[ २ ]

विलेपार्ले ' भगिनीसमाज 'चा दिवाणखाना स्त्रियांनीं व मुलांनीं फुलून गेला असून जुन्यानव्या चालीच्या महिलांचा मेळावा आपापले ' स्वतंत्र गट ' निर्माण करून गप्पाष्टकांत गढून गेला आहे. एकमेकींच्या रूपाची, शिणगाराची चर्चा–चिकित्सा मोकळ्या मनानें पण हलक्या आवाजांत सर्वत्र चाललेली असून गलबला, कुजबूज, मधून मधून हंशा, मुलांचें रडणें–ओरडणें इत्यादींचा संमिश्र कल्लोळ सुरू आहे. व्यासपीठावर एका बाजूस संस्थेच्या कार्यकर्त्या सौ. सावित्रीबाई, सौ. शारदाबाई, सौ. सरस्वतीबाई व सौ. सुशीलाबाई गंभीर मुद्रेनं खुर्चीवर अधिष्ठित झाल्या असून दुसऱ्या बाजूस श्रीमंत सौ. लक्ष्मीबाई, सौ. रमाबाई, सौ. अन्नपूर्णाबाई वगैरे गांवांतील श्रीमंत, पोक्त, ' वजनदार ' महिला खुर्चीवर विराजमान झाल्या आहेत. संस्थेच्या सेक्रेटरी सौ. माईसाहेब व कु. शोभना यांची धांदल चालू असते.

**अन्नपूर्णाबाई :** ( जांभई देऊन हळूच ) का हो माईसाहेब, ही बया येणार आहे तरी केव्हां ? ( माईसाहेब त्यांच्याकडे पाहिल्यासारखें करून आपल्याच तोऱ्यांत दुसरीकडे निघून जातात. )

**शोभना :** ( पुढें होऊन मनगटावरील घड्याळांत पहात ) आत्तां येतील. वेळ तर होऊन गेली...( माईसाहेबांच्या मागोमाग जाते. )

**लक्ष्मीबाई :** तिला कसलं वेळेचं महत्त्व ?

**अन्नपूर्णाबाई :** अहो, विलायतेला जाऊन आलीय् ना ?

**रमाबाई :** पण तिकडे ती वक्तशीरपणा शिकायला थोडीच गेली होती! ह्ज्जार कामांचा लकडा तिच्यामागं...

**लक्ष्मीबाई :** कसलीं डोंबलाचीं कामं?

**रमाबाई :** दवाखाना तर आहे?

**अन्नपूर्णाबाई :** हो. तो आहे जाग्यावर. पण ही कुठं असते तिथें? जेव्हां पहावं तेव्हां आपली 'आऊट'!

**रमाबाई :** होक्का? मग अशानं दवाखाना कसा चालतो?

**लक्ष्मीबाई :** नांव आहे ना मोठं? नांव मोठं नि लक्षण खोटं!

**रमाबाई :** पण नांव तरी उगीच कसं होईल?

**अन्नपूर्णाबाई :** देशभक्तीच्या जाहिरातीमुळं! नाहीं लग्न! नाहीं संसार! नसत्या चळवळी केल्या कीं आयता होतो गाजावाजा चहूंकडे...आपोआपच प्रॅक्टीस वाढून चैनचंगळ...

**रमाबाई :** पण एरव्हीं तरी तिला काय कमी आहे चैनीला? गडगंज संपत्ति आहे...

**अन्नपूर्णाबाई :** पण लोभ आहे ना? पैसा कधीं नकोसा का झालाय् कुणाला कित्ती मिळाला तरी? त्यांतून ही तर पक्की लोभी...

**लक्ष्मीबाई :** खरंच बाई! गोरगरिबांनासुद्धां मोफत औषधं देत नाहीं.

**अन्नपूर्णाबाई :** गोरगरीब मरूं देत! घरच्या मंडळींच्यासुद्धां औषध-पाण्याचं बील वसूल करीत असेल ती...!

[ सर्वजणी हंसतात. इतक्यांत बाहेर रस्त्यावर मोटारीचा हॉर्न वाजतो. शोभना व माईसाहेब धांवत दारांत जातात.

**लक्ष्मीबाई :** उगवली वाटतं एकदांची!

**शोभना:** आल्या...आल्या बरं का मंदाकिनीदेवी!

[ मंदाकिनी येते. टाळयांच्या गजरानें तिचें स्वागत होतें. माईसाहेब तिला व्यासपीठाकडे घेऊन जातात. सर्वत्र किंचित् शांतता पसरते. एका कोपऱ्यांतून पुढील कुजबूज ऐकूं येते.

**एक बाई :** इश्श ! हीच का ती ? अगदीं खादीचं गोणपाट गुंडाळूनच आलीय् कीं लंकेची पार्वती !

**दुसरी :** मग काय, तुमच्याप्रमाणं गौरीसारखं नटून थटून यावं म्हणतां तिनं ?

**तिसरी :** नाकीं डोळीं बरी आहे...

**चौथी :** इश्श ! नुसता झपाटा दिसतोय् ! थोडं तरी मार्दव चेहऱ्यावर ?

**दुसरी :** बुद्धीचं तेज तर आहे !

**पहिली :** कप्पाळ !

[परस्पर परिचयाचे औपचारिक सोहाळे संपल्यानंतर मंदाकिनी स्थानापन्न होते. शोभना व माईसाहेब सावित्रीबाईंच्या कानांशीं कांहीं पुटपुटतात. सावित्रीबाई शेजारच्या शारदाबाईंच्या कानांशीं लागतात. दोघीजणी माना डोलावतात. लगेच माईसाहेब टेबलाजवळ जाऊन उभ्या राहतात व भाषण सुरूं करतात.

**माईसाहेब :** प्रिय भगिनींनो ! सालाबादप्रमाणं आज आपल्या 'भगिनी-समाजा'तर्फे मकरसंक्रांतिनिमित्त सार्वजनिक हळदीकुंकवाचा समारंभ साजरा होत आहे. आजच्या या समारंभाचं अध्यक्षस्थान माझ्या भगिनी श्रीमंत सौ. अन्नपूर्णाबाई यांनीं स्वीकारावं अशी मी त्यांना नम्र विनंति करतें. आपणां सर्वांस त्या सुपरिचित आहेतच. 'भगिनीसमाज' संस्थेवर त्यांचं प्रथमपासूनच फार प्रेम असून समाजाला वेळोवेळीं त्यांचं बहुमोल सहाय्य होत असतं. फार काय सांगूं ? आजच्या समारंभाचा सगळा खर्च देण्याचं त्यांनीं स्व-खुषीनं, उदार अंतःकरणानं मान्य केलं आहे. (टाळ्या) तरी त्यांनीं अध्यक्ष-स्थान स्वीकारून आम्हाला उपकृत करावं.

**शोभना :** प्रिय भगिनींनो ! माईसाहेबांच्या सूचनेला मी दुजोरा देतें.

[सौ. अन्नपूर्णाबाई अध्यक्षस्थानीं जातात. व टाळ्यांच्या कडकडाटांत भाषण सुरूं करतात.

**अन्नपूर्णाबाई :** प्रिय भगिनींनो ! आपण मला अध्यक्षपदाचा बहुमान दिलात याबद्दल प्रथमच मी आपले मनापासून आभार मानतें. वास्तविक, या बहुमानाला मी पात्र नाहीं...

[ हळूंहळूं गलबला सुरू होतो.

**शोभना :** ( माईसाहेबांच्या कानांशीं पुटपुटते ) लवकर आटप म्हणावं बाई हें एरंडाचं गुऱ्हाळ !

[ अन्नपूर्णाबाईचें भाषण वाढत्या गलग्याच्या पार्श्वसंगीताच्या साथींत सुरूच असतें.

**अन्नपूर्णाबाई :** ( सूर चढवून ) आतां जगद्विख्यात विदुषी डॉ. मंदाकिनीदेवी यांचा परिचय करून देणं म्हणजे सूर्याला आरसा दाखविण्यासारखंच आहे ! त्यांना कोण ओळखीत नाहीं ? अख्खा महाराष्ट्र त्यांना पूर्णपणें ओळखून आहे ! ( हंशा व टाळ्या ) त्यांची विद्वत्ता, त्यांची समाजकल्याणाची कळकळ वाखाणण्यासारखी नाहीं...

[ धाप लागल्यामुळें अन्नपूर्णाबाई बोलतांना किंचित् थांबतात. हंशा होतो. त्या गांगरतात पण तसेंच धीरानें पुढें बोलूं लागतात.

...वाखाणण्यासारखी नाहीं, असं कोण म्हणेल ? थोर समाजसेवेप्रमाणंच त्यांचा स्वार्थत्यागहि दांडगा आहे. असो. आतां मी त्यांना आपलं व्याख्यान सुरू करण्याची विनंति करून खालीं बसतें. ( हंशा व टाळ्या )

[ 'हुश्श' करून पदरानें वारा घेत अन्नपूर्णाबाई खुर्चीवर टेकतात तोंच लगबगीनें उठून माईसाहेब त्यांना कार्यक्रम दाखवीत त्यांच्या कानांशीं कांहीं पुटपुटतात. अन्नपूर्णाबाई लगेच उठतात.

**अन्नपूर्णाबाई :** व्याख्यानाच्या आधीं एक गोड कार्यक्रम आहे. येथील सुप्रसिद्ध 'गंधर्व–किन्नर–गायन–वादन–नर्तन–कला–मंदिर' मधील विद्यार्थिनी एक प्रार्थना-गीत म्हणतील.

[ चारपांच मुली हात जोडून ओळीनें उभ्या राहतात व तबलापेटीच्या साथींत पुढील गाणें म्हणतात.

सदय प्रभो ! तुज वंदिति विनता
दृढभावयुता भारत-वनिता

आर्यधर्मसंस्कृति-रति मंगल
वितरी सतत नव दिव्य तेज, बल
दावि जगतिं शुभ प्रगति-पथा

[ गाणें संपतांच यअध्क्षीणबाईच्या सूचनेवरून मंदाकिनी उठते व टाळ्यांच्या गजरांत भाषण सुरू करते.

**मंदाकिनी :** प्रिय भगिनींनो ! 'संक्रांतीचा संदेश' या विषयावर चार शब्द बोलण्यासाठीं मी यावेळीं आपणांपुढें उभी आहे. संक्रांतच काय, पण दसरा, दिवाळी वगैरे प्रत्येक सण आपणांला कांहीं ना कांहीं स्फूर्तिदायक नवा संदेश देत असतो. दसरा म्हणतो, 'रूढीचें सीमोल्लंघन करा नि प्रगतीचा मार्ग धरा !'...दिवाळी म्हणते, 'मनोमंदिरांत सुविचारांचे दीप पाजळा !'...त्याचप्रमाणं संक्रांत सांगते, 'आयुष्यांत परिवर्तन करा ! जीवनांत संक्रमण करा ! आणि आत्मोन्नतीचा मार्ग धरा !' प्रिय भगिनींनो ! आपली उन्नति म्हणजेच समाजाची उन्नति आणि समाजाची उन्नति म्हणजेच आपली उन्नति ! आपण समाजाचेच एक घटक आहोंत. म्हणून अहोरात्र समाजहितासाठीं झटून 'जनसेवा ती ईश्वरसेवा' हें तत्त्व आचरणांत आणलं पाहिजे. भावी पिढीच्या पाळण्याची दोरी आज आमच्या हातांत आहे. अन् जिच्या हातीं पाळण्याची दोरी तीच जगाला उद्धारी ! स्त्रिया म्हणजे विराट् राष्ट्रपुरुषाचं अर्धांग ! तें अर्धांग जर कार्यक्षम नसलं, निर्बल असलं तर अर्धांगवायू झालेल्या माणसाप्रमाणं राष्ट्रसुद्धां निर्बलच नाहीं का ठरणार ? ( हंशा व टाळ्या ) आमची जगद्वंद्य धर्मसंस्कृति आम्ही स्त्रियांनींच आजवर जीवापाड जतन केली नि पुढंहि केली पाहिजे...आजपर्यंत पुरुषांनीं आम्हाला अबला ठरवून घराच्या कोंडवाड्यांत कोंडलं, पण आतां समान हक्काचं, व्यक्तिस्वातंत्र्याचं नवयुग उगवलं ! आपल्या हक्कांना जागून पुरुषांच्या बरोबरीनं प्रत्येक क्षेत्रांत कर्तबगारी गाजवून आपण श्रेष्ठ ठरलं पाहिजे ! पुरुषांपेक्षां स्त्रिया केव्हांहि कांकणभर श्रेष्ठच आहेत, ही गोष्ट स्पष्टच आहे. हातच्या कांकणाला आरसा कशाला ? ( हंशा )...सारांश, आपण आर्यमहिलांनींच

देशाचा व स्वतांचा उद्धार केला पाहिजे. त्यासाठीं परोपकाराचं व्रत अंगिकारलं पाहिजे. अनाथांना साह्य केलं पाहिजे. आणखी काय केलं पाहिजे ?...

[ मंदाकिनी मध्येंच एकदम बोलतां बोलतां थांबते.

**माईसाहेब :** ( शोभनेच्या कानांशीं ) सटवी फारच लांबलचक चऱ्हाट वळायला लागली !

**शोभना :** पण मध्येंचशी थांबली ? पाठ केलेलं विसरली वाटतं ?

[ किंचित् आठवल्यासारखें करून मंदाकिनी घसा साफ करून पुढें बोलूं लागते.

**मंदाकिनी :** ...आणखी पुष्कळ केलं पाहिजे. भरीव समाजकार्य केलं पाहिजे.
( आवाज चढवून ) राजमाता जीजाबाईच्या सुपुत्राचा, श्रीशिवाजी महाराजांचा हा भाग्यशाली देश ! ( टाळ्या )...रणरागिणी झांशीवाली लक्ष्मीबाईचा हा पराक्रमी देश ! ( टाळ्या )...रजपूत वीरांगनांचा, पुराणकालीन पंचपतिव्रतांचा हा पुण्यवंत देश ! ( टाळ्या )...आपणांला एकच दिव्य संदेश देत आहे कीं, 'महिलांनो ! सुकन्या व्हा ! सुकांता व्हा ! ! सुमाता व्हा ! आणि देशाचा उद्धार करा !' एवढं सांगून मी आपली रजा घेतें.

[ टाळ्यांचा गजर होतो. मंदाकिनी बसतांच सौ. अन्नपूर्णाबाई उठतात.

**अन्नपूर्णाबाई :** व्याख्यान किति छान, सुंदर झालं, हें मी सांगायला नकोच. आतां उशीर झालाय् तेव्हां जास्त बोलून मी आपला वेळ घेत नाहीं.

[ आभार, हारतुरे, हळदीकुंकूं वगैरे होऊन समारंभ खलास होतो.

## [ ३ ]

सुगंधाचें घर. बाहेर व्हरांड्यांत पुढील गाणें स्वतांशीच गुणगुणत सुगंधा बसली आहे.

भारत माझा देव, धर्म, राजा !
स्वार्थ वसे नच लवहीं

त्याग ठसे मनिं पाही
तनु मन धन नित वाही
विमल लोकहितकाजा

[ मंदाकिनी येते.

**सुगंधा :** संपला का समारंभ ?

**मंदाकिनी :** संपला एकदांचा. दमलें बाई ! ( आरामखुर्चीवर धाडकन् अंग टाकते. ) चांगला तासभर गर्जून कंठशोष केला !

**सुगंधा :** पण आठ वाजून गेले. इतका वेळ काय चाललं होतं ?

**मंदाकिनी :** तो काय तुझ्या मंडळाचा समारंभ आहे चट्दिशीं उरकायला ?

**सुगंधा :** आमचं काय बाई ! दिवेलागणीलाच आंवरलं सारं. तुझ्यासारखी कुणी महापंडिता बोलाविली नव्हती ना अकलेचे दिवे पाजळायला... व्याख्यान द्यायला ?

**मंदाकिनी :** आमचा समारंभ झाला थाटाचा. पण मेली काडीची शिस्त नव्हती. समारंभाचं सोंग सगळं यथसांग साजरं झालं. पण काय त्या बायका ! काय तो त्यांचा गोंगाट-गोंधळ ! बाजार तरी बरा !

**सुगंधा :** तुझ्या व्याख्यानाला अध्यक्षीण ?

**मंदाकिनी :** होती ना एक पिकल्या केसांची अजागळ अंबाबाई ! काय पण तारे तोडीत होती अकलेचे ! मला तर एक अक्षर कळलं नाहीं...

**सुगंधा :** पण तूं काय बडबडलीस, तें तरी तुझं तुला कळलं का ?

**मंदाकिनी :** वा ! किती छाऽऽन झालं माझं व्याख्यान ! एकसारख्या टाळ्या नि हंशा ! मला पाहूनच डोळे दिपले सगळ्या बायकांचे. समाजांत मला केवढा मान आहे, तें आज मला प्रत्यक्ष उमजलं.

**सुगंधा :** रस्त्याकडेच्या शेंदूर फासलेल्या दगडालासुद्धां नमस्कार करण्यासाठीं अजागळ भाविकांचे हात यंत्रासारखे आपोआप उचलले जातात. मग

तुझ्यासारख्या बेगडी समाजसेविकांचं स्तोम या आंधळ्या, भोळ्या समाजांत माजल्यास नवल तें काय ? पुरे झालं कौतुक तुझं नि तुझ्या त्या व्याख्यानाचं ! वाणीप्रमाणं करणी नाहीं तर लोकांची अढळ श्रद्धा बसणार कशी तुझ्यावर ? उपरसे तो खूप बनी, लेकिन अंदरकी बात...

**मंदाकिनी :** ( हंसून ) सुगंधा जाने ! अग खुळे ! जगांत असंच चाललंय् चहुंकडे !

**सुगंधा :** कुठवर चालेल असंच ? एक दिवस चांगलं झणझणीत अंजन पडेल डोळयांत.

[ रखमाई येते.

**रखमाई :** बाईसाव, येळ झाली का पोरीला दवा द्यायची ?

**सुगंधा :** हो, खरंच. तिला आतां दुसरी पुडी दे...

[ रखमाई जाते.

**मंदाकिनी :** म्हणजे ? त्या पोरीला घरींच ठेवून घेऊन तूं तिची सेवा-शुश्रूषा चालविली आहेस वाटतं ?

**सुगंधा :** होय.

[ रखमाई येते.

**रखमाई :** दिली पुडी. दरदरून घाम सुटलाया पोरीच्या अंगाला...

**सुगंधा :** होय ना ! झालं तर. ताप पळाला. आतां काळजी नाहीं.

**रखमाई :** ( गहिंवरून ) बाईसाव, जगदंबाच भेटलांत तुमी मला ! माज्या पोरीला जगवलंत. लई उपकार झालं. माजी मायमाउली तूं !...( सुगंधाच्या पायावर डोकं ठेवते. )

**सुगंधा :** अग, हें काय खुळयासारखं ? सोड माझे पाय. मी विशेष तें काय केलं ? दुसऱ्याच्या उपयोगी पडणं, गरीबांना मदत करणं, माणूसधर्मच आहे हा !

**रखमाई :** पन समदीच मानसं तुमच्यावानी ह्यो धरम कुटं पाळ्त्यात ? जगामंदीं गरीबांची खरी दया गरीबास्नीच यायची. राक्शसाच्या काळजाच्या पैकेवाल्याला ती कंदीबी न्हाई येनार !

[ रखमाईच्या बोलण्याचा मंदाकिनीच्या मनावर परिणाम होऊन ती एकदम गंभीर बनते. रखमाई जाते. मंदाकिनीची मोलकरीण बायजा धावऱ्या धावऱ्या येते.

**बायजा :** ( मंदाकिनीस ) बाईसाब, बाईसाब, कुटं कुटं म्हणून धुंडाळायचं तुमास्नी ? चला, चला अदुगर...( पदरानं डोळे पुसूं लागते. )

**मंदाकिनी :** अग, पण झालं काय एवढं तें तर कळूंदे...

**बायजा :** मोटारचा अपघात झाला आईसाबास्नी...

**मंदाकिनी :** ( घाबरून ) मोटारीचा अपघात ?

**सुगंधा :** केव्हां ? कुठं ?

**बायजा :** याच रस्त्याला, नाक्यावर, मघाशी पाच वाजताच्या येळंला.

**सुगंधा :** ( मंदाकिनीस ) म्हणजे ? तूं व्याख्यानाला निघतेवेळीं त्या मुलीनं सांगितलं, एका म्हातारीला अपघात झालाय्...

**मंदाकिनी :** अग तोच ! आईलाच ॲक्सीडंट् ! सुगंधा, चल अशीच लवकर...

[ सर्वजणी घाईघाईनें जातात.

[ ४ ]

मंदाकिनीचें घर. डोक्याला बॅंडेजीस बांधलेली मंदाकिनीची आई कॉटवर तक्क्याला टेंकून डोळे मिटून पडलेली असून मधून मधून कण्हत आहे. सुगंधा व मंदाकिनी कॉटजवळ खुर्चीवर बसल्या आहेत.

**सुगंधा :** मंदा, आईसाहेबांना तूंच बरोबर घेऊन गेली असतीस व्याख्यानाला तर कशाला ओढवला असता हा भयंकर प्रसंग ? पण तुझा मोठेपणा आड आला.

**मंदाकिनी :** आग लागो माझ्या मोठेपणाला !

**सुगंधा :** आज यांचा पुनर्जन्मच झाला म्हणायचा !

**मंदाकिनी :** अन् माझाहि पुनर्जन्मच झाला. जन्माची आठवण राहिली मला.

**आईसाहेब :** ( कण्हत ) कुठं आहें मी ?

**मंदाकिनी :** आई ! आई !!

**आईसाहेब :** मंदा ! माझी मंदा कुठं आहे ?

**मंदाकिनी :** ही मी तुझ्याजवळच बसल्येंय् ना ग आई ! स्वस्थ पडून रहा.

**आईसाहेब :** मंदा, मी किनई तुझ्याच व्याख्यानाला जात होतें पार्ल्याला टॅक्सी करून...तुझी वाट पाहिली...तूं आली नाहींस...परस्पर गेलीस. पण बाळ, चागलं झालं ना व्याख्यान ? व्हायचंच चांगलं...माझी बाळ गुणाची...

[ मंदाकिनीला एकदम गहिंवर फुटून रडूं कोंसळतें.

**मंदाकिनी :** आई ! आई !! केवढी ग चांडाळीण, पापीण मी ! तूं इकडे तळमळत होतीस अन् मी तिकडे व्याख्यानबाजी करीत माझ्या ढोंगी समाज-सेवेचं, पोकळ विद्वत्तेचं प्रदर्शन मांडीत होतें !...आई ! प्रत्यक्ष तुझी लाडकी लेक डॉक्टरीण ! पण वेळेवर तिचा तुला उपयोग झाला नाहीं ! आग लागो माझ्या शिक्षणाला नि मोठेपणाला ! समाजाला तर नाहींच नाहीं पण घरच्या जिव्हाळ्याच्या माणसांनाहि माझा उपयोग होऊं नये...(स्फुंदून रडूं लागते. )

**सुगंधा :** आतां तरी उघडले का डोळे ?

**मंदाकिनी :** साफ उघडले. माझी समाजसेवेची धुंदी पार उतरली. संक्रांतीनंच माझ्या आयुष्यांत आज खरंखुरं संक्रमण केलं. माझ्यासारखी बेजबाबदार बोलघेवडी, स्वार्थी स्त्री...

**सुगंधा :** मंदा ! खरोखरीच तुला पश्चात्ताप झाला असेल तर घे...आईसाहेबां-च्याच पायावर हात ठेवून निरपेक्ष समाजसेवेची शपथ घे ! आणि यापुढं कळकळीनं समाजहिताचं प्रत्यक्ष कार्य कर. मंदा ! आईसाहेबांच्याप्रमाणंच आपली देशमाताहि व्याकुळ झाली आहे. तिच्या पवित्र सेवेंतच आयुष्याचा प्रत्येक क्षण वेंचला तरच अवघ्या जीविताचं सार्थक ! निस्स्वार्थ समाजसेवा ह्याच आत्मोन्नतीचा सोपा नि खात्रीचा राजमार्ग आहे !

**मंदाकिनी :** सुगंधा, आज मला खरी कर्तव्यजागृति झाली. या क्षणापासून मी माझं आयुष्य निरपेक्ष लोकसेवेला वाहिलं. माझ्या मातृदेवतेचे हे मंगल चरणच या माझ्या प्रतिज्ञेला साक्ष आहेत !

[ मंदाकिनी आईसाहेबांच्या पायावर डोकें ठेवते. पडदा पडतो.

## पात्रें :

[ प्रवेशाच्या अनुक्रमानें ]

**कावेरी**

**सख्याहरी**

**प्रवासी**

**ठुमऱ्या**

शिवाय, इन्स्पेक्टर, पोलीस, वगैरे.

---

**प्रसंग :** पावसाळ्यांतील एक वादळी, अमावास्येची रात्र. साडेनवाचा सुमार. लोणावळें येथील गांवाबाहेरच्या आंबराईतला रस्त्यालगतचा सुखात्मे यांचा बैठा बंगला.

सबंध कथाभाग दोन तासांत घडलेला आहे.

---

# रात्रीचा पाहुणा

बाहेर पावसाळी सर्द हवा पडली असून गर्द अंधार पसरला आहे. थंडगार वारे भणाणत असून अधूनमधून विजांचा कडकडाट नि मेघांचा गडगडाट कानावर आदळत आहे. दिवाणखान्यांत सख्याहरी सुखात्मे रेडिओवर निरनिराळीं स्टेशनें लावण्याच्या उद्योगांत गढले आहेत. रेडिओंतून टर्रर घर्रर असे वेगवेगळे विचित्र आवाज निघताहेत. पलीकडे कोपऱ्यांत सख्याहरींची सौभाग्यवती, कावेरी, पाळण्यांतल्या तान्हुल्याला जोजवीत पुढील गाणें म्हणत आहे.

गडे ! नीज नीज झणिं घननीळा !
वेल्हाळा ! लडिवाळा !
किति रे नाचशि हांसशि खेळशी
थांबिव चाळा राजस बाळा !

निवांत दुनिया शांत निजे ही
रजनी गाई तिज अंगाई
तूंहि अतां करी जो जो गाई
अजुनि तुझा कां वाजत वाळा ?

**कावेरी :** बंद करा पाहूं आतां ती कटकट.

**सख्याहरी :** शिंचं एकसुद्धां स्टेशन स्वच्छ ऐकूं येत नाहीं ! हवाच खराब पडलीय्.

**कावेरी :** पुरे झालं तें तुमचं रेडिओचं कौतुक ! पांच मिनिटं कांहीं सुरळीत चालत नाहीं. मध्येंच टर्रर्र अन् घर्रर्र ! पोरगं दचकून उठायचं...

**सख्याहरी :** तुझ्या गाण्यानं मात्र उठायचं खरं. भसाड्या आवाजांत अंगाई गाणं...

**कावेरी :** तर तर ! पण माझं गाणं संपलं. तुमचं तें रडगाणं बंद करा.

**सख्याहरी :** ही घे मुंबई ! भावगीत ऐक. ( रेडिओवर 'आला खुषींत समींदर...' हें गाणें ऐकूं येऊं लागतें. पण मध्येंच आवाज सुरू होतो. )

**कावेरी :** ऐका ! लागला खवळून गरजायला तुमचा तो समींदर ! काय मेले एकेक आवाज तरी विचित्र निघताहेत ! कधीं रेडकूं ओरडल्यासारखा तर कधीं शंख फुंकल्यासारखा ! कधीं चुरचुरीत फोडणी दिल्यासारखा तर कधीं रटरट भाजी शिजल्यासारखा !...

**सख्याहरी :** मद्रास मिळतंय का बघतों....( शिट्या फुंकल्यासारखे आवाज ऐकूं येऊं लागतात. )

**कावेरी :** अगोबाई ! शिट्या कोण फुंकायला लागलं ? मद्रासच वाटतं हें ! ( मोठ्यानें हंसते )

**सख्याहरी :** मुंबईलाच फक्कड प्रोग्राम आहे यावेळीं...

[ रेडिओच्या बँडचे खटखट आवाज...त्यानंतर एकदम वाऱ्याचें जोराचें घोंघावणें–दाराखिडक्यांची उघडझांप–खडखड, तडतड, धडधड इत्यादींच्या मिश्र आवाजांचा कल्लोळ सुरू होतो.

**सख्याहरी :** अग, उठ, उठ आधीं. तीं दारं खिडक्या लावून टाक. थैमान मांडलंय् वाऱ्यानं...कौलं उडणार छपरावरचीं! काय पण झोंबतंय् वारं अंगाला!

[ कावेरी उठून दारें खिडक्या लावते. रेडिओंतून घरघर आवाज ऐकूं येऊं लागतो. ]

**कावेरी :** बंद करा पाहूं तो रेडिओ ! लागली त्याला घरघर...धड ऐकूंहि येत नाहीं कांहीं नीट...कंटाळा आला–

[ इतक्यांत बाहेर पावसाची दांडगी सर कोसळूं लागते. गारांच्या वर्षावाचे ताडताड आवाज ऐकूं येतात.

**सख्याहरी :** अरे बापरे ! पाऊस ! अन् गारासुद्धां पडताहेत वाटतं ? ( खिडकी उघडून पाहूं लागतो ) छट् ! तोंड बाहेर काढायची सोय नाहीं. पाऊस कीं सोंग ! हुः हुः हुः ! काय मनस्वी गारठा आहे हवेंत ! ( खिडकी धाडकन् बंद करतो. बाहेरच्या दारावर कुणीतरी धक्के दिल्याचें ऐकूं येतें. )

**सख्याहरी :** आँ ! दारावर धक्के ?...अन् यावेळीं ?

**कावेरी :** भास झाला तुम्हाला. यावेळीं कोण येणार ?

**सख्याहरी :** तूं नाहीं ऐकलंस दार खडखडलेलं ?

**कावेरी :** बाहेर पाऊस तांडव—थैमान घालतोय नि इकडं तुमचा रेडिओ किंचाळतोय ! काय ऐकूं येणार या हलकल्लोळांत ? [ पुन्हां दारावर धक्के ] अगबाई ! खरंच कोण धडक्या देतंय् दाराला ? चोरबीर तर नसेल—

**सख्याहरी :** चोर ! चोर कशाला मरायला येतोय् इकडं अशा पावसांत नि काळोखांत ?

**कावेरी :** अहो ! अशाच वेळीं चोराला फावायचं !

**सख्याहरी :** ऊठ आधीं; बघ कोण आलंय तें ! मग चालूंदे तुझं तर्कट ...म्हणे चोर ! कुणीतरी बिचारा वाटसरू सांपडला असेल पावसांत–आला असेल आसरा शोधीत...( दारावर धक्के) ऊठ, ऊठ, दार उघड—

**कावेरी :** मी नाहीं बाई ! तुम्हीच उघडा जाऊन—

**सख्याहरी :** हात् भित्री भागुबाई ! ( उठून बाहेरच्या खोलींत येतात. ) कोण आहे ?

**बाहेरून आवाज :** मी आहें...

**सख्याहरी :** मी कोण ?

**बाहेरून आवाज :** पाहुणा आहे पाहुणा ! दार उघडा जरा मेहरबानी करून—

**कावेरी :** पाहुणा ! अन् अशा अपरात्रीं कुठून उलथला इकडे ?

**सख्याहरी :** जरा हळू बोल—

**कावेरी :** आधीं रेडिओ बंद करा. ( स्वतांच बंद करते. ) आतां काठी घ्या हातांत नि मग दार उघडा—

**सख्याहरी :** काठी कशाला ? कुणाला मारायला ? दारांत पाहुणा आलाय् ...साप नव्हे !

[ सख्याहरी कडी काढून दार उघडतात. पावसानें भिजून चिंब झालेला एक प्रवासी थंडीनें काकडत दारांत उभा असतो.

**प्रवासी :** ( घरांत प्रवेशून ) माफ करा हं ! तकलीफ दिली तुम्हांला रात्रींच्या वेळीं...

**सख्याहरी :** तकलीफ कसली यांत ? या-या आधीं आंत या ! दार लावून घेऊंदे-( दार बंद करून ) पावसाचा जोर भयंकर आहे—

**प्रवासी :** हॉरिबल्ड ! ठार केलं पावसानं ! सारं अंग चेंचून निघालंय् गारांच्या मारानं...गुडगाभर पाणी रस्त्यावर—अन् काळोख तर मी म्हणतोय...

**सख्याहरी :** अमावास्येची रात्र नि त्यांतून आभाळ गच्च भरलेलं...

**प्रवासी :** टेरिबल् ! हेव्ही रेन्स ! साऱ्या आयुष्यांत एवढं प्रचंड तुफान आजच पाहिलं बुवा ! मुंबईहून गाडी घेऊन निघालों त्यावेळीं पावसाचं चिन्हहि नव्हतं ! पण कल्याण सोडलं नि एकदम मुसळधार वर्षाव ! पाऊस नि गारा ! तरी पण इथंपर्यंत आलों कसातरी......पण पुढं गाडी चालविणंच मुष्कील झालं...

**सख्याहरी :** म्हणजे ? पंक्चर वगैरे...

**प्रवासी :** छे हो ! एक दांडगं झाडच कोसळून पडलंय् आडवं रस्त्यावर !

**सख्याहरी :** काय म्हणतां ?

**प्रवासी :** झाड कसलं, दुर्दैवच आडवं पडलंय् म्हणा ना ? गाडी तशीच रस्त्याच्या कडेला उभी केली...दुरून उजेड पाहिला तुमच्या बंगल्यांत अन् टोकली इकडे धूम !

**सख्याहरी :** कांहीं हरकत नाहीं. बसा त्या खुर्चीवर. टावेल घ्या हा... तोंडबिंड पुसा. कपडेही भिजलेत ! पण असं लंगडतां हो कां ? आपटी खाल्लीत वाटतं कुठं चिखलापाण्यांत ? साष्टांग नमस्कार ! (हंसतो.)

**प्रवासी :** नो ! नो ! माझा उजवा गुडघा मुळांतच अधू आहे जरा. धांवपळींत जास्तच दुखायला लागलाय्...पावसाची एवढी सर थांबेपर्यंत थांबतों मग पाहूं पुढें काय करायचं तें...

**सख्याहरी :** रस्ताच बंद केलाय् झाडानं—होय ना ? मग कसले जातां आतां ? सकाळीं पाहतां येईल. रात्रभर विश्रांति घ्या—

**प्रवासी :** छे, छे, भलतंच ! तुमच्या आदरातिथ्याबद्दल आभारी आहें मी ! पण मला दहापांच मिनिटांपेक्षां अधिक थांबतांच येत नाहीं—

**सख्याहरी :** एवढं निकडीचं–महत्वाचं काम आहे ?

**प्रवासी :** तर–तर ! अहो, झाडंच काय पण रस्त्यावर प्रत्यक्ष मरण आडवं आलं तरी मला रस्ता काटलाच पाहिजे...

**सख्याहरी :** बसा–बसा आधीं. जरा गरम गरम चहा तर घ्या...

**प्रवासी :** ओ यस् ! पण आधीं माझी तेवढी बॅग घेऊन येतों गाडींतून...

**सख्याहरी :** घेऊन या. पाऊस आंत येतोय्. दार लावून घेतों. पुन्हां ठोठावा.

[ प्रवासी जातो. सख्याहरी दार बंद करतात.

**कावेरी :** ( पुढें येऊन ) पुन्हां कुठं गेला तो पाहुणा ?

**सख्याहरी :** बॅग आणायला मोटारींतून—

**कावेरी :** म्हंजे ? स्वतांची मोटार आहे वाटतं ?

**सख्याहरी :** अग, फार मोठा माणूस दिसतोय् तो ! बडी आसामी !

**कावेरी :** पण त्याचं नांवगांव ?

**सख्याहरी :** विचारलं नाहीं बुवा ! विचारूं आतां हळूहळू...माणूस मात्र मोठा...यांत शंका नाहीं...बडदास्त राखली पाहिजे त्याची. तूं जा झटपट ...चहा कर–पण चहा नको–कॉफीच कर...दूध पुष्कळ घाल...नाहींतर दुधांतलीच कॉफी कर म्हणजे झालं ! लवकर हां...गारठलाय् बिचारा...येईल आत्तां...( रेडियोचें बटन दाबून ) कामाला लाग–कामाला लाग—

**कावेरी :** अन् तुम्ही इकडे रेडियो ऐकत बसतां वाटतं ?

**सख्याहरी :** पाहुण्यांची करमणूक नको करायला ? बडा माणूस तो...अन् त्याला तरी कळूंदे कीं, आमच्याहि घरीं रेडिओ आहे...

**कावेरी :** तर काय ! मोठ्ठं वैभवच हें ! करा प्रदर्शन वैभवाचं !

[ कावेरी जाते. रेडिओवर गाणें ऐकूं येऊं लागतें. पण तें मध्येंच थांबतें.

**सख्याहरी :** ( त्रासून ) मधेंच काय झालं ?

[ रेडिओवर अनाऊन्सर बोलूं लागतो.

**अनाऊन्सर :** ऑल इंडिया रेडिओ...मुंबई-पोलीसकमिशनर साहेबांच्या सांगण्यावरून पुढील जाहीर बातमी देण्यांत येत आहे–"आज संध्याकाळीं सहा वाजण्याचे सुमाराला येथील एका जवाहिऱ्याच्या दुकानांतील साठ सत्तर हजार किंमतीच्या जडजवाहिरावर राजरोस डल्ला मारून एक इसम मोटारींतून फरारी झाला आहे. पोलीस-तपास जारीनें सुरू आहेच. नखशिखांत साहेबी पोषाख, उंचेला, सडपातळ, वर्णानें काळासावळा, असा तो इसम असून त्याच्या तोंडावर देवीचे पुसट वण आहेत. चालतांना तो जरा लंगडतो. अशा वर्णनाच्या सदरहू इसमाला पकडून देणारास रोख एक हजाराचें इनाम सरकारनें जाहीर केलें आहे. बातमी संपली—"

[ सख्याहरी बातमी ऐकून आश्चर्यचकित होतात. घाबरून घोगऱ्या खोल पण स्पष्ट आवाजांत ओरडतात.

**सख्याहरी :** अग बायको, बायको ! इकडे ये आधीं. ऐकलंस का ? आधीं इकडं ये—( कावेरी आंतून लगबगीनें येते. )

**कावेरी :** काय झालं ओरडायला ?

**सख्याहरी :** काय करते आहेस ?

**कावेरी :** पाहुण्यांना कॉफी ! कां ? घाबरलांत कां असं ? आगबीग लागली कीं काय कुठं ?

**सख्याहरी :** आग लागलीतर विझवतां येईल—पण—पण भयंकर प्रसंग ओढवलाय् आपल्यावर—

**कावेरी :** ( घाबरून ) म्हंजे ?

**सख्याहरी :** अग हा पाहुणा–हा इसम फरारी झालेला चोर–दरवडेखोर–डाकू आहे ! पोलीस त्याच्या पाठीवर आहेत—साठसत्तर हजारांचं जवाहीर चोरून—

**कावेरी :** ( मटकन् खालीं बसून ) अगाई ग ! तरी मला वाटलंच होतं. यावेळीं रात्रींचा कोण पाहुणा येणार ? माझं कध्धीं खोटं व्हायचं नाहीं. पण तुम्हीं काय ! चोराला रात्रीचं घरीं घेतलंत ? दिवे ओवाळा अकलेवरून ! आई अंबाबाई ! आतां तूंच सांभाळ ग बाई !

**सख्याहरी :** तुझं तोंड बंद कर आधीं. हळू बोल. भिंतीला कान असतात—

**कावेरी :** अन् आकाशाला वाचा फुटते ! मला ठाऊक आहे. पण तो चोर आहे, हें आत्तांच कसं हो कळलं तुम्हाला ?

**सख्याहरी :** आकाशाला वाचा फुटली !

**कावेरी :** आकाशवाणी झाली कीं एखाद्या कर्णपिशाच्चानं सांगितलं ?

**सख्याहरी :** ( रेडियोकडे बोट दाखवून ) हेंच तें कर्णपिशाच्च ! यानंच आकाशवाणी केली...

**कावेरी :** रांडेच्यांनो ! रेडिओवर कां कळली ही बातमी ? नवल आहे बाई !

**सख्याहरी :** आतां तरी कळलं का तुला रेडियोचं महत्त्व ?

**कावेरी :** पण तोच हा कशावरून ?

**सख्याहरी :** अग तोच हा ! गुडघ्यांत अधू, काळा रंग, देवीचे वण, साहेबी पोशाख–तंतोतंत वर्णन जुळलं ! तरी पाहिल्याबरोबर पहिल्याच झटक्याला वाटलंच मला. या गृहस्थाची मुद्रा अशी फरारी चोरासारखी कावरीबावरी कां ?...तर खरोखरच हा फरारी जंटलमन् डाकू !

**कावेरी :** पण आतां पुढें कसं करायचं ?

**सख्याहरी :** ( विचार केल्यासारखें करून ) बस्स ! ठरलं ! असंच करायचं !

**कावेरी :** तो आत्तां येईल पुन्हां बॅग घेऊन—

**सख्याहरी :** येऊंदे...आलाच पाहिजे तो–

**कावेरी :** करूंदे ठणाणा ! दारच उघडूं नका. ऐका माझं. कृपा करा—

**सख्याहरी :** शहाणीच आहेस तूं ! बायकोचं ऐकायला बायल्या नाहीं मी ! कमा झालों तरी पुरुष आहें ! असा घाबरून हातपाय गाळून रडत बसणार नाहीं तुझ्यासारखा—

**कावेरी :** मग कोणता पराक्रम गाजविणार ? चोराशी गांठ आहे—

**सख्याहरी :** तो चोर आहे तर मी चोरावरचा मोर आहें ! पहा माझी करामत ! आयता तावडींत सांपडालाय् ! घरीं चालून आलाय् चोर ! रात्रभर ठेवतों कोंडून अन् सकाळीं देतों पोलीसठाण्यावर वर्दी ! त्याच्या हातांत ते कडी–तोडे नि आपल्या हातांत रोख हजाराचा तोडा !

**कावेरी :** म्हंजे ? त्याला पकडून देणाराला बक्षीस लावलंय् वाटतं सरकारनं !

**सख्याहरी :** मग सांगतों काय तुला ? नुसती कॉफी नको. शिरा कर. कांदेपोहे कर–चोराला चांगला पाहुणचार करूनच चकवला पाहिजे. आज आमचा पाहुणचार, उद्यां पोलीसांचा ! जा झटपट. कामाला लाग–कामाला लाग—

**कावेरी :** पण मी म्हणतें जरा सावधगिरीनंच—

**सख्याहरी :** ठुमन्या कुठं आहे ? झोंपला वाटतं ? घरांत पाहुणा, नव्हे चोर शिरलाय् नि हा गधडा झोपलाय् कसला ? ठुमन्या ! ठुमन्या !

**ठुमन्या :** ( धांवत येऊन ) जी धनीसाब !

**सख्याहरी :** सारीं घरगुतीं हत्त्यारं गोळा करून ठेव...कुऱ्हाड, कोयता, पहार, विळी, सुरी, चाकू, कात्री–

**कावेरी :** काठी, लाठी, मुसळ, लाटणं, पाटा–वरवंटा—

**ठुमन्या :** कशाला होवं इक्तं ? डोळ्यांत घालावी मिरच्याची पूड आन्—

**सख्याहरी :** तुझी अक्कल नको चालवूं. चल जा—( दारावर धक्के ) आलाच तो ! कामाला लागा–कामाला लागा—( ठुमन्या व कावेरी जातात. सख्याहरी दरवाजा उघडतात. )

**प्रवासी :** ( प्रवेशून ) पावसाचा जोर वाढतोच आहे. कमी होत नाहीं—

**सख्याहरी :** ( खोटें हंसत ) हेःहेःहेः ! रात्रीचा पाहुणा ! सकाळीं जायचा !

**प्रवासी :** कोण ? पाऊस कीं मी ?

**सख्याहरी :** तुम्ही दोघंही—

**प्रवासी :** भलतंच ! मला आत्तां गेलंच पाहिजे. पाऊसच काय पण प्रळयकाळ आला तरी मला थांबतां येत नाहीं—

**सख्याहरी :** पण जाणार कसे ? रस्ताच अडलाय् ना ? पण तें जाऊं दे. चहा—फराळ तर जरा आरामानं करा. विश्रांति घ्या. मग पाहूं जाण्याराहण्याचं—

**प्रवासी :** फार उपकार आहेत बुवा तुमचे !

**सख्याहरी :** माझे कसचे ? तुमचेच उपकार आहेत आमच्यावर ! तुमच्या-सारखे थोर सद्गृहस्थ आमच्या गरीबाच्या घरीं पायधूळ झाडणार म्हणजे काय कमी भाग्याची गोष्ट आहे ! अहो ! हजाराचा तोडा हातीं पडल्याचा आनंद झाला आहे मला !

**प्रवासी :** योगायोगाच्या गोष्टी !

**सख्याहरी :** ठुमऱ्या ! ठुमऱ्या ! फराळाचं आण जलदी—

**ठुमऱ्या :** ह्ये आनलं नव्हं का !

[ ठुमऱ्या कॉफीचे पेले व फराळाचं ताट ठेवून जातो.

**सख्याहरी :** चालूंदे आतां सावकाश फराळ !

**प्रवासी :** काय हो हें ! कशाला हें सारं ! कांदेपोहे—शिरा—कॉफी—

**सख्याहरी :** कॉफीबरोबर कांहीं हवंच ना ? बरं आपलं नांव गांव...

**प्रवासी :** माझं नांव विश्वालंकार सत्यनारायणम् ! जगप्रवासी आहे मी !

**सख्याहरी :** विश्वालंकार सत्यनारायणम् ! अजब आहे बुवा नांव ! नांवापुरतं तरी बंगाल-मद्रासचं मिक्श्चर दिसतंय् ! बरं पण धंदा—बिझिनेस ?

**प्रवासी :** धंदा ! धंदा काय, अनेक धंदे करतों मी ! जनरल मर्चंटस् अँड कमिशन् एजण्टस् ! अख्ख्या दुनियेंतले धंदे आले यांत !

**सख्याहरी :** येस् ! राईट !

**प्रवासी :** बरं पण आपलं नांव ?

**सख्याहरी :** माझं नांव सख्याहरी सुखात्मे !

**प्रवासी :** नोकरी–धंदा ?

**सख्याहरी :** कांहीं नाहीं. आपलं घरचंच पाहतों. पोटापुरता जमिनीचा तुकडा आहे वडिलार्जित—

**प्रवासी :** आय सी ! यू आर लॅंडलॉर्ड ! ( चहाफराळ संपवितो. )

**सख्याहरी :** ताटांतच हात धुवा—( सिगारेटची डबी पुढें करतात. )

**प्रवासी :** षोक नाहीं मला सिगारेटचा. पण ओढतों कधीं कधीं आवसे पुनवेला–( सिगारेट घेऊन पेटवितो. )

**सख्याहरी :** मग आवसच आहे आज ! एक सोडून चार ओढा–( हंसतो. )

**प्रवासी :** छान कोटी केलीत ! गुड् जोक ! ( हंसतो.)

**सख्याहरी :** ठुमऱ्या ! ठुमऱ्या ! ( ठुमऱ्या येतो त्यास ) पाहुण्यांच्या खोलींत बिछाना, दिवाबत्ती, तांब्याभांडं...

**ठुमऱ्या :** समदी चोख येवस्था केली हाय ! ( जातो. )

**प्रवासी :** म्हणजे ! मांडलंय् काय तुम्ही ? मी मुक्काम करणार नाहीं–

**सख्याहरी :** राहिलं ! पण जरा आडवे तर व्हाल बिछान्यावर घटकाभर... तोंपर्यंत पाऊस थांबेल...

**प्रवासी :** ( उठून ) छे–छे ! मला आतां गेलंच पाहिजे. प्रत्येक क्षण मोलाचा आहे—

**सख्याहरी :** अहो ! पण एवढी काय घाई आहे ! कामं साऱ्यांनाच असतात–

**प्रवासी :** तसं नव्हे पण—

**सख्याहरी :** पणबीण कांहीं नाहीं. आम्ही नाहीं सोडणार तुम्हाला. चला–पाहुण्यासाठींच स्पेशल खोली आहे ही ! चला–व्हा आंत—

[ सख्याहरी प्रवाश्याला खोलींत लोटतात. ]

**प्रवासी :** हा जुलूम आहे बुवा तुमचा ! भलताच आग्रह म्हणजे काय ?

**सख्याहरी :** या ताणून आतां ! निवांतपणें सकाळपर्यंत आराम करा—

[ चटकन् दाराला बाहेरून कडी लावून घेतात.

**प्रवासी :** ( आंतून ओरडतो ) अहो, पण दाराला कडी कशाला लावतां ?

**सख्याहरी :** नुसती कडी लावीत नाहीं. तर भलं दांडगं कुलूपच ठोकतों दाराला ! ठुमऱ्या, कुलूप आण जलदी–

[ ठुमऱ्या कुलूप आणून देतो. सख्याहरी दाराला कुलूप ठोकतात.

**प्रवासी :** ( दार खडखडावीत ) म्हणजे ? तुम्ही काय मला कोंडून ठेवतां होय ? मी काय कुणी चोर, दरोडेखोर–

**सख्याहरी :** भलतंच ! बडे जंटलमन् तुम्ही ! विश्वालंकार सत्यनारायणम् ! विश्वाचा हा अलंकार बंदोबस्तानं कडीकुलपांत ठेवायला नको ? आतां आरडा-ओरडा करूं नका. स्वस्थ झोंपा.

**प्रवासी :** अहो, दार उघडा !

[ प्रवासी ओरडत राहतो. सख्याहरी तिकडे लक्ष न देतां ठुमऱ्या व कावेरी यांचेशीं हळूहळू कुजबुजूं लागतात.

**सख्याहरी :** ठुमऱ्या ! आज झोंपायचं नाहीं—

**ठुमऱ्या :** नाय झोंपायचं—

**सख्याहरी :** या दारावर रात्रभर खडा पहारा–

**ठुमऱ्या :** खडा पाहरा !

**सख्याहरी :** सारीं हत्यारं तयार !

**ठुमऱ्या :** समदीं तय्यार !

**कावेरी :** अहो ! पण तुमचा पहारा राहील इकडे अन् खिडकीचे गज तोडून तो चोर परस्पर पोबारा करील तिकडे !

**सख्याहरी :** त्याचा बाप आला पाहिजे माझ्या बंगल्याच्या खिडकीचे खंबीर गज तोडायला––

**प्रवासी :** अहो ! सुखात्मे !... धर्मात्मे !... कर्मात्मे !... पापात्मे !... दार उघडा बऱ्या बोलानं ! नाहींतर सभ्य गृहस्थाची बेअदबी केल्याबद्दल पोलीसांत वर्दी देऊन खटला भरीन तुमच्यावर—

**सख्याहरी :** पण दार उघडलं तर चोराला घरांत आश्रय दिल्याबद्दल पोलीस मला पकडून खटला भरतील ना माझ्यावर ?

**प्रवासी :** म्हणजे ? मला काय तुम्ही चोर, डॅबीस समजतां ?

**सख्याहरी :** (स्वताशीं पुटपुटत) बैस लेका खुशाल कोकलत! मला खटल्याचं–पोलीसाचं भय घालतोय! चोराच्या उलट्या बोंबा!

[ इतक्यांत बाहेरच्या दरवाजावर धक्के ऐकूं येतात.

**कावेरी :** पुन्हां कोण आणखी आलं? चोरच वाटतं. चोरांचं पेंवच फुटलंय् कीं काय आज?

**सख्याहरी :** चोर नसतील. पोलीस असतील! याच्या मागावर पोलीस आहेत ना?

**कावेरी :** हो तर! पोलीस यायला बसलेत अशा पावसापाण्यांत? पोलीसांचं सोंग घेतलेले चोरच असतील कुणी तरी. नका उघडूं दार—

[ दारावर पुन्हां धक्के.

**सख्याहरी :** कोण आहे?

**पोलीस :** आम्ही आहोंत पोलीस! मेहरबानी करून दार उघडा—

**सख्याहरी :** अग बायको! पोलीसच! सांगितलं नाहीं मी?

**कावेरी :** पण त्यांना कसं कळलं, चोर आमच्या बंगल्यांतच आहे म्हणून?

**सख्याहरी :** अग, चोराचीं पावलं चोरच ओळखणार! शिवाय, पोलीस म्हणजे परमेश्वर! त्यांना काय कळत नाहीं? सारं कळतं!

[ सख्याहरी दार उघडतात. इन्स्पेक्टर व एक दोन पोलीस येतात.

**इन्स्पेक्टर :** माफ करा. आम्ही एका गुन्हेगाराच्या तपासांत आहोंत. पावसानं कहर मांडलाय्–शिवाय, रस्ता मोकळा नाहीं म्हणून—

**सख्याहरी :** मोटारच अडली असेल तुमची! झाड आडवं पडलंय् ना?

**इन्स्पेक्टर :** तर हो! फरारी गुन्हेगारसुद्धां इथंच कुठं तरी जवळपास असला पाहिजे. कारण रस्ताच नाहीं मोकळा पुढं जायला...एक मोटारहि उभी आहे रस्त्यावर—

**सख्याहरी :** यू आर राईट! तुमचा तर्क बरोबर आहे. पण चोराला पकडायचं तुमचं काम मीच केलंय्!

**इन्स्पेक्टर :** म्हणजे? म्हणतां काय? चोर पकडला?

**सख्याहरी :** नुसता पकडला? खोलींत कोंडून ठेवला!

**प्रवासी :** ( खोलींतल्या सामानाची आदळआपट करीत ओरडतो. ) अहो सुखात्मे ! मुकाट्यानं दार उघडा ! नाहींतर भयंकर परिणाम भोगावे लागतील...याद राखा.

**सख्याहरी :** जरा थांबा. महाशय ! तुमचीच व्यवस्था लावण्यांत गुंतलोंय् मी. ( इन्स्पेक्टरकडे वळून ) ऐका हा त्याचा जळफळाट ! लेकानं सारा बंगला डोक्यावर घेतलाय् !

**इन्स्पेक्टर :** पण हाच तो फरारी गुन्हेगार, हें तुम्हाला कसं कळलं ?

**सख्याहरी :** रेडियोमुळं ! रेडियोवर याची बातमी अन् याचं आगमन ! जवळजवळ दोन्ही एकाच वेळीं...

**इन्स्पेक्टर :** आय सी ! छाऽऽन ! ( पोलीसास ) नंबर तीनशेंतीन ! तय्यार !

[ शिपाई व इन्स्पेक्टर आपापलीं पिस्तुलें सरसावतात.

**सख्याहरी :** ती खोली ! तो चोर ! कुलूप काढा...चोर पकडा...पंचनामा करा...काय हवं तें करा...माझी जबाबदारी संपली !

**इन्स्पेक्टर :** तुम्ही बेफिकीर रहा ! आमचं आम्ही पाहून घेतों आतां. तो चोर आहे अन् आम्ही आहोंत...हो पण...तुमचं नांवगांव आधीं सांगा पाहूं ! ( खिशांतून डायरी व फाऊन्टनपेन काढतो. )

**सख्याहरी :** ( गोंधळलेल्या मुद्रेनें ) म्हणजे मलाहि अडकवितां कीं काय या प्रकरणांत ?

**इन्स्पेक्टर :** तुमची साक्ष काढावी लागेल. शिवाय, हजार रुपयांचं बक्षीस मिळायचं आहे ना तुम्हाला ? चोराला पकडून दिल्याबद्दल ! आहांत कुठं !

**सख्याहरी :** ( आनंदानें ) हो–हो ! तें मी विसरलोंच होतों. घ्या टिपून. माझं नांव सख्याहरी सुखात्मे ! वय सुमारें छत्तीस वर्षें. धंदा जमीनदारी. जात...

**इन्स्पेक्टर :** जात कळली. आतां फक्त पत्ता सांगा...

**सख्याहरी :** पत्ता ! ‘ एकांत ’ लोणावळा !

**इन्स्पेक्टर :** एकांत ? ही एकांताची भानगड काय आहे ?

**सख्याहरी :** भानगड कसली ? ‘ एकांत ’ हें माझ्या बंगल्याचं नांव आहे...( इन्स्पेक्टर सर्व लिहून घेतो. )

**इन्स्पेक्टर :** ( हंसून ) अस्सं–अस्सं ! अच्छा ! आतां आम्ही आमच्या उद्योगाला लागतों...तेवढं तें कुलूप काढा खोलीचं—

**सख्याहरी :** छे बुवा ! आपली नाहीं हिंमत. ठुमऱ्या, कुलूप काढ खोलीचं—

[ ठुमऱ्या वेगवेगळ्या किल्ल्या चालवीत घाबरटपणानें खोलीचें कुलूप काढूं लागतो. पोलीस व इन्स्पेक्टर पिस्तुलें सरसावून सावधगिरीनें खोलीच्या तोंडाशींच दोघे दोन बाजूला असे उभे राहतात.

**सख्याहरी :** ( कावेरीस हळूंच ) बायको ! अग बायको ? निभावलं कीं नाहीं सारं यथासांग ?

**कावेरी :** पण चोर तोच ना ? कीं चोर सोडून संन्यासी सुळीं...!

**सख्याहरी :** खुळी आहेस खुळी ! चोर तोच ! एक हजार रुपये रोख मिळणार आतां ! कशामुळें बोल ? रेडिओच्या कृपेनं !

**कावेरी :** खरंच ग बाई ! रेडिओच्या कृपेनं !

[ ठुमऱ्या कुलूप काढून खोली उघडतो. क्रोधानें लालबुंद झालेला प्रवासी ओरडत बाहेर येतो.

**प्रवासी :** कुठं आहे...कुठं आहे तो विश्वासघातकी, हरामखोर घरमालक ?

**इन्स्पेक्टर :** ( एकदम पिस्तूल रोंखून ) सबूर ! खामोष ! बदमाष !

[ प्रवासी घाबरून दोन्ही हात वर करून जागच्या जागीं थबकतो.

**प्रवासी :** बदमाष ! कोण मी ? वा इन्स्पेक्टरसाहेब ! खूप न्याय आहे हा ! तुम्ही मला कोण समजतां ?

**सख्याहरी :** तुला आम्ही कोण समजतों, हें अजून नाहीं समजलं तुला ? तुझं हें डोकं आहे कीं देवदारी खोकं ! चोराच्या उलट्या बोंबा ! रास्कल !

**प्रवासी :** ( त्वेषानें ) मी रास्कल ? तूं रास्कल... तुझा बाप रास्कल !

**पोलीस :** एऽऽ ! बडबड–बकवा बंद कर.

**इन्स्पेक्टर :** ( पोलीसांस ) इशारा द्या पार्टीला...

[ पोलीस शिटी फुंकतो. इतक्यांत बाहेर रस्त्यावर गडबड चाललेली ऐकूं येते. प्रथम भरधांव मोटार येत असल्याचा आवाज...ती एकदम

थांबविल्यामुळें ब्रेकचा किंचाळल्यासारखा आवाज...नंतर पोलीसांच्या कर्कश शिव्या...पिस्तुलांचे थाडथाड आवाज...वगैरे.

**इन्स्पेक्टर :** काय गडबड आहे रस्त्यावर ?

**सख्याहरी :** चोर तर हा इथें आहे ! तुमच्या त्या लोकांनीं तिकडं कुणाची धरपकड चालवलीय् रस्त्यावर ? भलत्यालाच कुणाला पकडलं कीं काय त्यांनीं चोर समजून ?

[ इतक्यांत एक पोलीस घाबऱ्या घाबऱ्या धांवत पळत येतो.

**पोलीस :** ( सलाम करून इन्स्पेक्टरास ) साहेब–साहेब ! फरारी गुन्हेगार सांपडला...अटक झाला...

**इन्स्पेक्टर :** कुठला गुन्हेगार ? गुन्हेगार तर हा इथें आहे !

**पोलीस :** असं कसं होईल ? झडतींत मुद्देमाल सांपडला त्याच्याजवळ.

**इन्स्पेक्टर :** खरंच ? ( हातांतलें पिस्तूल गळून पडतें. ) मग आम्ही भलत्यालाच पकडलं ! ( प्रवाश्याला ) माफ करा हं ! उगीच त्रास झाला तुम्हाला... ( सख्याहरीकडे वळून रागानें ) सुखात्मे ! या घोंटाळ्याबद्दल सर्वस्वी जबाबदार तुम्ही आहांत ! ( सख्याहरी घाबरून थरथरा कापूं लागतात. ) हजार रुपयांच्या बक्षीसाचा लोभ तुम्हाला सुटला...अन् या सद्‌गृहस्थांवर तुम्ही नसती आफत ओढवलीत !

**सख्याहरी :** ( काकुळतीनें ) तसं नाहीं साहेब !...

**इन्स्पेक्टर :** चूप् ! यापुढं तरी रेडिओवरल्या बातम्या अशा अर्धवट ऐकत जाऊं नका...नीट दोन्ही कान उघडे ठेवून काळजीपूर्वक ऐकत जा...खरं म्हणजे, या प्रकाराबद्दल खटलासुद्धां भरतां येईल तुमच्यावर...

**सख्याहरी :** ( हात जोडून ) माफ करा इन्स्पेक्टरसाहेब !

**इन्स्पेक्टर :** माझी माफी काय मागतां ? या सद्‌गृहस्थांची माफी मागा !

**सख्याहरी :** ( प्रवाश्याला ) माफ करा मिस्टर ! माझ्या हातून गाढवपणा झाला खरा...

**प्रवासी :** ( चवताळून ) गाढवपणा ? सैतानीपणा झाला ! बोल, हैवान ! कांय समजलास तूं मला ?

[ प्रवासी अंगावर धांवून जाऊन सख्याहरीचें नरडें धरतो. इन्स्पेक्टर मध्यें पडून सोडवितो.

**इन्स्पेक्टर :** ( प्रवाश्यास ) जाऊंद्या हो राव ! काय रागावतां त्यांच्यावर ! अशा मूर्खांची नेहमीं कींवच करावी !

**सख्याहरी :** ( उभयतांस ) घोड चूक झाली खरी. आतां तुमची क्षमा तरी मी कोणत्या तोंडानं मागूं ? काय बोलूं ? साष्टांग नमस्कारच घालतों तुम्हाला !

[ सख्याहरी दोघांनाहि साष्टांग नमस्कार घालतात. इन्स्पेक्टर प्रवाश्याशीं हस्तांदोलन करून शिपायांसह हंसत हंसत निघून जातो. पडदा पडतो.

